# मुक्तेश्वर--सभापर्व

[ अेक विवेचक अभ्यास ]

: लेखक :

प्रा. दु. का. संत, एम. ए.

श्री स. रा. गाडगीळ, एम्. ए.

मॉडर्न बुक डेपो, पुणें २.

१९५० ] [ किं. १२ आणे

# निवेदन

बी. ए. च्या परीक्षेसाठीं प्रस्तुत पुस्तक नियुक्त केल्यामुळें लेखकांना त्यावर हा विवेचक अभ्यास लिहिण्याची संधि प्राप्त झाली. हा अभ्यास विद्यार्थ्यांप्रमाणें सर्वसाधारण वाचकांसहि उपयुक्त आहे, असे अभिप्राय कांहीं तज्ज्ञांनी व्यक्त केल्यामुळें हा अभ्यास स्वतंत्र रीतीनें सादर करीत आहोंत. त्याबद्दल लेखकांना साभिमान आनंद वाटणें साहजिक असले तरी श्रेय प्रकाशकाचें आहे हें विसरून चालता येत नाहीं.

मुक्तेश्वरावर आजपर्यंत झालेल्या टीकांचा उपयोग हा अभ्यास लिहितांना करून घेतला आहे. त्यांत प्रामुख्यानें महाराष्ट्रसारस्वतकार भावे, पांगारकर, चिं. वि. वैद्य यांचा उल्लेख करावा लागेल. अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेल्या प्रा. द. सी. पंगू व प्रा. वि. म. कुलकर्णी यांच्या आवृत्त्यांचें बहुमोल साहाय्य झालें आहे व त्याबद्दल वरील प्राध्यापकद्वयांचे आभारी आहोंत. महाकाव्यासंबंधीं लिहितांना गु. डॉ. वाटवे यांच्या 'पंचप्राणांनीं' मदत केली. त्यांचे पण आभारी आहोंत.

अभ्यासाच्या प्रारंभीं असलेलें विवेचन जुन्या वाङ्मयाच्या सर्वसाधारण अभ्यासासाठीं उपयुक्त ठरेल अशी आशा आहे. वाचकांचें त्याकडे लक्ष वेधणें आवश्यक वाटतें.

विद्यार्थी व अभ्यासक ह्या अभ्यासाचें योग्य तें स्वागत करतील अशी आशा आहे.

हें स्वतंत्र प्रकाशन नव्हे. वर उल्लेखिलेल्या बी. ए. मराठींतील हा भाग अभ्यासाचे सोयीसाठीं वेगळेपणानें काढला आहे एवढेंच.

पुणें.

दु. का. सं.

स. रा. गा.

# विषयक्रम

# मुक्तेश्वर : सभापर्व

## प्राचीन मराठी काव्य व त्याचें सामाजिक व वाङ्मयीन महत्त्व

प्राचीन मराठी काव्य प्रामुख्यानें दोन प्रकारचें आहे. ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत संत कवींनीं परमेश्वरभक्ति हें आपलें जीवनकेंद्र कल्पून अध्यात्मप्रवण काव्य लिहिलें. या भक्तिप्रधान काव्याचा उच्चबिंदू तुकारामाच्या काव्यांत साधला गेला आहे. याच काळांतील दुसऱ्या प्रकारचें काव्य म्हणजे मुक्तेश्वर, मोरोपंत आदि व्युत्पन्न पंडितांनीं संस्कृत पुराण वाङ्मयाला देशी भाषेचा साज चढविला हें होय. ज्ञानेश्वर, तुकाराम या संत कवींच्याहून या पंडित कवींचा काव्यहेतु कांहींसा भिन्न आहे. परमेश्वरभक्ति, आत्मानात्म चर्चा हें संतकवींचें ध्येय होतें; काव्य हा त्यांचा आद्य हेतु नव्हता. पंडित कवींच्या काव्याचें स्वरूप या दृष्टीनें थोडेसें भिन्न आहे. त्यांच्यापुढें संस्कृत महाकाव्यांचा आदर्श होता. त्या आदर्शानुसार काव्य करणें हा त्यांचा आद्य हेतु. परमेश्वरभक्ति हा हेतु तर त्यांना अभिप्रेत होताच, पण त्यांच्या काव्यांत कलेला प्राधान्य होतें. म्हणून त्यांना पंडितकवि किंवा कलाकवि म्हणण्याचा प्रघात आहे.

या दोनहि काव्यप्रकारांत अध्यात्मप्रवणतेला जें महत्त्व आहे त्याला फार मोठा सामाजिक अर्थ आहे. त्या काव्यांचें सामाजिक महत्त्व अनन्यसाधारण आहे. त्याची केवळ ‘ संताळे ’ वा ‘ टाळकुटे ’ वा ‘ भाषांतरकार ’ म्हणून कुचेष्टा करतां येत नाहीं व ती करणें योग्य नव्हे. केवळ मराठी भाषेच्या दृष्टीनें पाहिलें तर या सर्व काव्यांचें अव्वलपण मान्य करावेंच लागतें. ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत, मुक्तेश्वर इत्यादि कविश्रेष्ठांच्या वाङ्मयांतून मराठी भाषेचा जळजळित अभिप्राय प्रदोपदीं प्रतीत होतो, व तोच अत्यंत महत्त्वाचा आहे. या वाङ्मयाला जे सामाजिक महत्त्व आहे तें ओळखलें नाहीं तर जुन्या काव्याचें अध्ययन अपुरें राहील. ज्ञानेश्वरांपासून रामदासापर्यंतचे व नंतरचेहि बहुतेक

मराठी कवि हे अत्यंत व्युत्पन्न होते. अगदीं अशिक्षित गणला गेलेला तुकारामहि या कवींइतकाच व्युत्पन्न होता असें पांगारकरांनीं सोदाहरण सिद्ध केलें आहे, (पाहा--पांगारकर कृत तुकारामचरित्र तुकारामाचें अध्ययन) व त्यांत बराच अर्थ आहे. तेव्हां यांना संस्कृत रचना करणें अशक्य तर खचित नव्हतें. पण त्यांनीं एवढ्या साक्षेपानें मराठीमध्येच कां रचना केली? संस्कृत रचना केली असती तर त्यांना कदाचित् विद्वत्सभेत अधिक सन्मान मिळालाहि असता. पण विद्वानांचा धिक्कारहि पत्करून या महान् वाग्भटांनीं मराठींत रचना केली, व आपले विचार तींत मांडले, या गोष्टीला सामाजिक अर्थ आहे. संस्कृतांतलें ज्ञान श्रेष्ठ खरें पण तें सर्व साधारण व्यक्तीपावेतों गेलें पाहिजे असा निदिध्यास या कवींना लागून राहिला होता. याशिवाय मराठींत रचना संभवत नाहीं, व दुसरें कारणच सांपडत नाहीं. ज्ञानेश्वरांना आपला गीतेचा 'भावार्थ' संस्कृतमध्ये सांगतां आला नसता काय? यासाठीं आणखी थोडें विवेचन करणे आवश्यक आहे.

आर्य लोक हिंदुस्थानांत आल्यानंतर त्यांच्या जीवनाला एक प्रकारची स्थिरता आली. बाराहि महिने आपल्या उदकानें संतृप्त करणाऱ्या गंगा-यमुना सिंधूंच्या खोऱ्यांतून त्यांना समृद्धतेचा साक्षात्कार झाला. समाज-जीवन अधिक गुंतागुंतीचें, सखोल होऊं लागलें. बौद्धिक, सांस्कृतिक, अध्यात्मिक क्षेत्रांत प्रगति होऊं लागली. इ. सनाच्या ४ थ्या पांचव्या शतकापर्यंत ही प्रगति अकुंचित होती. पण पुढे या प्रगतीचा ओघ खुंटला. साधारणपणे इ. स. १००० च्या सुमारास समाजांतील विचारवंतांना ही जाणीव स्पष्ट होऊं लागली होती. पूर्वकालीन आर्यांची अध्यात्मिक बौद्धिक प्रगति स्तिमित करीत होती, पण सभोंवतालची परिस्थिति तितकीच निराशेची होती. ही प्रगति कां खुंटली गेली असा विचार करतां त्यांना असें आढळून आलें कीं, ही उच्च व उन्नत विचारांची गंगा बुद्धिवान ब्राह्मणांनीं जरी स्वर्गांतून आणली तरी, ती समकालीन ब्राह्मण वर्गाच्या संस्कृतच्या जटेंतच घोंटाळत आहे, आणि सर्व साधारण समाजाप्रत न आल्यानें हा अनर्थ झाला; तेव्हां, ही ज्ञानाची गंगा संस्कृतच्या जटेंतून काढून सामान्य व्यक्तीप्रत न्यावयास हवी हें पटून ते त्या कार्यास उद्युक्त झाले. त्यांचा मार्गहि अपेक्षेबाहेर यशस्वी झाला. आज आपण सामाजिक समतेच्या जगांत वावरत आहोंत. पण ह्या सामाजिक

समतेच्या पूर्वीची महत्त्वाची पायरी म्हणजे अध्यात्मिक समता प्रस्थापित करणें ही होय; व ही अध्यात्मिक समता प्रस्थापित करण्याचें अत्यंत महत्त्वाचें कार्य मराठी संत मंडळानें केलें आहे; सामाजिक समतेचा विचार आज आपणांस जितका आकर्षक, प्रभावी व प्रगतिशील वाटतो तितकाच किंबहुना त्यापेक्षां अधिक प्रभावी, असा अध्यात्मिक समतेचा विचार तत्कालिक विचारवंतांना व लोकांना वाटत आला आहे. समाजांतल्या प्रत्येक थरांतून महान् भक्त असे संतकवि पुढे आले हें ह्या प्रयत्नाला आलेलें घवघवीत फळ होय.

या संतकवींच्या किंवा पंडितकवींच्या काव्यांत भक्तीचा महिमा एवढ्या साक्षेपानें असण्याचें आणखी एक कारण म्हणजे मुसलमानांचें आक्रमण हें पण म्हणतां येतें. मसलमानांची उपासना पद्धति सोपी होती त्या मानानें आपली मूर्तिपूजवर आधारलेली उपासना पद्धति ही बरीच गुंतागुंतीची व अवघड होती. ती सोपी आहे असें भक्तीच्या रूपानें त्यांना दाखवून देणे शक्य झालें असें प्रा. न. र. फाटक यांचें मत आहे.

संस्कृतांतील ज्ञान सर्वसामान्य लोकांच्यापर्यंत पोंचविण्यासाठीं तें मराठींत आणलें पाहिजे हा हेतु तर या कवींच्या काव्यानें साधलाच, पण त्याशिवाय भक्तिप्राधान्यानें परमेश्वर उपासनेची सुलभताहि जनतेच्या मनावर बिंबविण्यांत त्यांना यश आलें. ज्ञानेश्वर तुकारामादि संत कवींच्या काव्याचें हेंच रहस्य आहे.

## प्राचीन मराठींतील कथाकाव्य

मुक्तेश्वर, मोरोपंत यांच्या काव्याचीहि संगति वरील पद्धतीनें लावतां येते. संस्कृतमध्ये ज्याप्रमाणे श्रुतिस्मृतींतील गहन तत्त्वांचें कथारूपानें विवरण करण्यासाठीं पुराणांचा उगम झाला, त्याप्रमाणेच ज्ञानेश्वर, मुकुंदरायांनीं काव्यामध्ये जी आत्मनात्मचर्चा केली ती कथारूपानें, रामकृष्णांच्या चरित्ररूपानें सामान्य लोकांना सांगून त्यांच्यांतील धर्मनिष्टा, सत्यनिष्ठा, कर्तृत्व इ. गुण जागृत करावेत या हेतूनेंच या पंडितकवींनीं रामकृष्णांच्या कथा मराठींत आणिल्या. अध्यात्मिक व भौतिक अगर ऐहिक अशा द्विविध दृष्टीनें या काव्यांचें महत्त्व आहे. परमेश्वर, मोक्ष, धर्म, भक्ति या मूल्यांची उपासना हें या काव्याचें अध्यात्मिक महत्त्व होय. आणि सत्यनीतिप्रवणता, कर्मनिष्ठपणा, सहिष्णुता, भूतदया, मर्यादितसमता इ. तत्त्वांचा पुरस्कार

हें यांचें ऐहिक महत्त्व होय. या द्विविध मूल्यांचा साक्षेप आविष्कार म्हणून जुनें साहित्य तपासणें हें खचित उद्‌बोधक होणार आहे. या ठिकाणीं कथा काव्याचाच प्रामुख्यानें विचार करावयाचा असला तरी कथाकाव्य ज्या काव्य प्रांताचा एक परगणा आहे त्याचें अव्वल स्वरूप पाहणे हें आवश्यक होतें म्हणून हें विवेचन कांहींसें विस्तारानें केलें.

मराठी कथाकाव्याचा आढावा घेतांना एकनाथांपासून सुरुवात करण्याची पद्धति आहे. नाथांचें 'रुक्मिणीस्वयंवर' हें साधारणपणें या प्रकारचें पहिलें काव्य गणलें जातें. त्यांच्या पूर्वीचें मराठी वाङ्मय म्हणजे मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव यांचें वाङ्मय होय. मुकुंद राजांचा विवेकसिंधु आणि ज्ञानेश्वरांचा अनुभवामृत हे ग्रंथ उपनिषदांमधील अद्वैतसिद्धांत देशी भाषेत सांगण्यासाठींच निर्माण झाले आहेत. ज्ञानेश्वरी तर गीतेवरील टीका. युद्धाचा प्रसंग पाहून अर्जून संमूढ झाला आणि ही संधि साधून व्यासांनीं श्रीकृष्णाच्या द्वारां अध्यात्मशास्त्राची चर्चा गीतेमध्ये केली. या सर्व उत्तमोत्तम काव्यामध्यें कथानकाला वाव नाहीं. मराठीमध्यें कथाकाव्याला अद्यापि प्रारंभ झालेला नव्हता. याला महानुभावीय वाङ्मय हा अपवाद आहे. दामोदर सूरींचें 'वत्सहरण,' भास्करभट्टांचें 'शिशुपालवध,' नरेंद्रांचें 'रुक्मिणी स्वयंवर'—हीं महानुभावांचीं कथाकाव्ये आहेत. यांतून महानुभावांचा परमेश्वर जो श्रीकृष्ण त्याच्या भक्तीला व त्यांचें जें तत्त्वज्ञान (द्वैतवाद) त्याला अधिक वाव मिळावा हें पण क्रमप्राप्तच ठरतें. महानुभावांचें तत्त्वज्ञान जरी वेगळे होतें तरी सर्वसामान्य हिंदु समाजाची व त्यांची जीवननिष्ठा एकच असल्यानें त्यांच्या काव्यांत तसा मौलिक फरक नाहीं. परंतु महानुभावांचा प्रयत्न हा पंथनिविष्ट असल्यानें त्याचा परिणाम व व्याप्तीही मर्यादित होती.

हा अपवाद सोडला तर एकनाथापासून मराठी कथाकाव्याच्या परंपरेस सुरुवात झाली असें म्हणतां येतें. बहुतेक मराठी काव्य अध्यात्मशास्त्रामध्येंच रममाण झालें होतें. अशा वेळीं एकनाथांनीं कृष्णकथा सांगण्याचा उपक्रम केला. इंग्रजींत ज्याला narrative poetry म्हणतात असें आख्यानकाव्य नाथांनींच प्रथम लिहिलें. जुनी अध्यात्माची पूर्वपरंपरा न सोडतां नव्या आख्यान पद्धतीचा उपक्रम करण्यांत नाथांनीं मोठेच कौशल्य दाखविलें आहे. एकनाथांच्या नंतर मुक्तेश्वर, सामराज, मुद्‌गल, नागेश, विठ्ठल, रघुनाथपंडित

वामन, मोरोपंत, निरंजनमाधव, श्रीधर इत्यादि कवींनीं कथाकाव्य लिहून मराठीचें साहित्य समृद्ध केलें आहे.

हे सर्व कवी व्युत्पन्न होते पंडित होते. यांचा संस्कृत साहित्याचा व साहित्य शास्त्राचा पण अभ्यास होता. त्यामुळे, त्यांना परमेश्वर, धर्मनीति इ. अध्यात्मिक मूल्यांइतकेंच संस्कृत साहित्यशास्त्रप्रणित रस, अलंकार, वृत्त-कौशल्य, रचनाकौशल्य इ. मूल्यांचें महत्त्व वाटत होतें व त्यांना धरूनच त्यांनीं काव्य लिहिलें. संतकवींनी ज्या अध्यात्मिक समतेचा पुरस्कार केला ती समता समाजाच्या मनांत बिंबवावयाची असेल तर कथापद्धतीनेंच ती यशस्वी-रीत्या बिंबवितां येईल. हें या व्युत्पन्न वर्गानें ओळखलें व तें कार्य त्यानें पार पाडलें असें म्हणावयास हरकत नाहीं. इंग्रजी अंमलाच्या प्रथमावस्थेनंतर आगरकरांनीं ज्या नव्या विचारांचें जोरानें व आग्रहानें उद्गान केलें, तेच विचार हरीभाऊंनीं कादंबरीबद्ध करून शिक्षित समाजाच्या कोनाकोपऱ्या-पावेतों नेले. ते नेतां नेतां कलात्मकता आपाततः आली, तसाच प्रकार कथाकवींचा आहे. ज्ञानेश्वरादि संत कवींचेच विचार कथारूपानें या लोकांनीं अनुवादिले.

वर उल्लेखिलेल्या सर्व मूल्यांस अवसर देण्याच्या दृष्टीनें या कवींना रामायण, महाभारत हे आदर्श ग्रंथ वाटावेत यांत नवल नाहीं. वस्तुतः हे ग्रंथ इतिहासग्रंथ आहेत. पण यांत मानवी जीवनाच्या अविष्करणाचे दृष्टीनें महत्त्वाचें प्रसंग खूप आहेत. त्यामुळे कवीच्या मनोवृत्ती प्रवृत्तीप्रमाणे, परिस्थितीप्रमाणे, त्याला जे जे प्रसंग अधिक आकर्षक वाटले ते त्यानें काव्य-रूपानें आपल्या भाषेत रंगविले. संपूर्ण रामायण व भारत लिहिण्याचे यत्न झाले, पण थोडे; बहुतेक कवि ‘ स्फुट प्रकरण ’ किंवा एखादा वेचक प्रसंग निवडणारेच.

हीं कथाकाव्ये अधिक निर्माण होण्याचें वा प्रसृत होण्याचें मुख्य साधन—कारण—म्हणजे कीर्तनें होत. परमेश्वराचें संकीर्तन करतां करतां, हर्षविमर्षादि भावनांनीं रंगून जावें, वा त्यामुळे परमेश्वर भक्तीचा आनंद अधिक स्पष्टपणें उपभोगावयास मिळाल्यानें कथाकाव्ये कीर्तनपद्धतीवर गेलीं आहेत. कवी मधून मधून श्रोत्यांना आवाहन करतो, अवधान द्यावें म्हणून सांगतो याचें कारण तरी हेंच. ह्या कीर्तनाविना हीं कथाकाव्यें लोकप्रिय झालीं नसतीं.

ज्यांना कीर्तनाचा आस्वाद घेणे शक्य नव्हतें अशांच्या कक्षेत तत्सम आल्हाद या कथाकाव्यांनीं निर्माण केला व हेंच त्यांचें सामाजिक अधिष्ठान.

हें सामाजिक अधिष्ठान पाहिल्यानंतर कथाकाव्याचें स्वरूप असे कां याचा उलगडा होऊं लागतो. कीर्तन रंगण्यासाठीं एखादी लांबण लागतें, थोडे तात्त्विक विवेचन असावें लागतें, एकादा विनोदी प्रसंग असावा लागतो नीतिबोधहि कोठेंतरी हवाच. शिवाय हर्षशोकादि भावना, त्वेष, द्वेष हुरहुर ह्या सर्वांना वाव हवा. एखादा मजेचा कालविपर्यासहि जातां जातां पचून जाई–नव्हे कौतुकला जाई व अशा रीतीनें कथा काव्याचें स्वरूप हें संमिश्र होत गेलें. त्यांत जितका एक जिनसीपणा आहे तितकाच कवीच्या प्रवृत्तीप्रमाणे वेगळेपणास पण वाव आहे.

येथें आपणांस काव्य म्हणून या कथाकाव्यांचीं लक्षणे पाहावयाचीं आहेत. तीं साधारणपणे अशीं सांगतां येतील.

(१) या कथाकाव्यांतून प्रामुख्यानें रामायण भारतांतीलच प्रसंग निवडले आहेत. ते निवडतांना कवींना परमेश्वराची भक्ति जरी अभिप्रेत असली तरी प्रेमादि मानवी भावना, म्हणजे शृंगार, करुण, वीर, अद्‌भुत इ. रसांच्या अविष्करणासाठीं अनुकूल असेच प्रसंग निवडले आहेत. स्वयंवराचे (रुक्मिणी, सीता, द्रौपदी, दमयंती,) प्रसंग या सर्वांना आकर्षण वाटल्यास नवल नाहीं.

(२) हे बहुतेक कवि संस्कृत भाषाभिज्ञ असल्यानें त्यांना संस्कृत काव्य व साहित्य शास्त्रांचा त्यांतील रस अलंकार इत्यादींचा चांगलाच परिचय असे. व त्या संकेतांना अनुलक्षून काव्य करणे हा ह्या प्रकारच्या काव्याचा दुसरा विशेष होय. संस्कृत महाकाव्ये त्यांना आदर्श वाटतात व त्या धर्तीवर आपलें काव्य जावें हा त्यांचा आग्रह मधून मधून व्यक्त होतो. मुक्तेश्वर, सामराज, मोरोपंत, रघुनाथपंडित यांच्या काव्यावरून हें स्पष्ट होतें. कथाप्रसंग, रस, अलंकार, रचना, इ. प्रमाणे, वृत्तांच्या बाबतींतहि हीं कथाकाव्यें संस्कृतच्या धर्तीवर आहेत. पण या बाबतचें बंधन थोडे शिथिल आहे. मंदाक्रांता, शिखरिणी, शार्दूलविक्रीडित इ. वृत्तांतून यांची रचना आहे. मुक्तेश्वराची ओवी, मोरोपंतांची आर्या, हीं वृत्तें अपवादात्मक होत.

[ तथापि संस्कृत काव्याला सामाजिक अधिष्ठान नव्हतें तें मराठी कवींच्या ]

काव्याला होतें हा महत्त्वाचा भेद ध्यानांत घेतला पाहिजे. आश्रयदात्या राजाला रंजविण्यासाठीं अगर त्याच्या स्तुति वा मनोविनोदनासाठीं संस्कृत कवींचीं काव्यें निर्माण झालीं–निदान त्यांची भूमिका तरी तशी आहे. त्यामुळें त्यांत अलंकारांची, रसवत्तेची करामत असली तरी, त्यांत संकेत बोजडपणाच अधिक. उन्नत अशा जीवित मूल्यांची त्यांना ओढ होती असे कुठें दिसत नाहीं. मराठी कवींचा सबंध जमानाच वेगळा. त्यांचे रसिक वेगळे, विषय वेगळे, निष्ठा वेगळ्या, सर्वच निराळे होते.]

ज्ञानेश्वरापासून जो भक्तीचा महिमा सुरू झाला, त्याचा आधार व आश्रय या जुन्या मराठी कथाकाव्याला आहे व हें त्याचें महत्त्वाचें व्यवच्छेदक लक्षण आहे. राम व कृष्ण यांच्या जीवनांतील प्रसंग निवडण्याचें कारण त्यांच्या चरित्रांत भक्तीस भरपूर वाव आहे हेंच होय. त्याशिवाय तत्त्वज्ञान चर्चा, विशिष्ट नीतिधर्म, कर्मनिष्ठ वर्तणूक इ. गोष्टी मराठी कवींना तितक्याच महत्त्वाच्या वाटल्या व म्हणूनच त्यांनीं रामायणाची व विशेषतः महाभारताची निवड केली. कारण या सर्व विविध अंगोपांगांना अवसर त्यांतच मिळणें शक्य होतें. काव्यदृष्ट्या ह्या कवींनीं संस्कृतचेच संकेत वापरले. अतिशयोक्तपूर्ण वर्णन, उत्प्रेक्षा प्राधान्य, थोडासा कालविपर्यास, इ. विशेष त्यांना स्वीकार्य वाटले.

### कथाकाव्यांतील रामायण महाभारताचें महत्त्व

वर उल्लेखिलेलीं परमेश्वर, भक्ति, नीति...इ. अध्यात्मिक मूल्ये, व त्यांच्या अनुषंगानें रस, अलंकारादि वाङ्मयीन मूल्यें, या सर्वांचा यथोचित अविष्कार रामायण महाभारतांत कवींना सांपडलें व यांतच रामायण भारताचें मोठेपण आहे. महापुरुषांचीं चरित्रें त्यांना आदर्श वाटलीं नाहींत याचें कारण या मूल्यांबद्दलचा त्यांचा आग्रह हें होय. संस्कृत कवींना अध्यात्मिक समतेची कल्पनाच नसल्यानें, त्यांचें लक्ष राजावर केंद्रित झालें असणे साहजिक आहे. पण मराठी कवींचें तसें नव्हतें. त्यांना कोणा राजेश्वराची स्तुति करावयाची नव्हती. परमेश्वराची प्राप्ति हेंच त्यांचे अध्यात्मिक ध्येय होतें. ऐहिक जीवनांत नीतिमत्ता, सत्यनिष्ठा इ. तत्त्वांचा पुरस्कार करावा व चारहि पुरुषार्थांचें सात्त्विकस्वरूप जनतेला दाखवून द्यावें याच उद्देशानें त्यांनीं आपलीं काव्ये लिहिलीं. या द्विविध ध्येयाला महाभारतांत चांगलाच अवसर मिळाला. निरनिराळ्या बावीस कवींनी भारतावर रचना केली, ती कां

केली असावी, व त्यांचें लक्ष तत्कालीन राजकीय घडामोडींकडे कां गेलें नाहीं याचा उलगडा असा होऊं शकतो.

राम आणि कृष्ण यांच्या चरित्राला आणखीहि एका दृष्टीनें महत्त्व आहे. परमेश्वराचे अवतार म्हणून त्यांच्याकडे लक्ष जाणे हें क्रमप्राप्त होतें. पण त्याहिपेक्षां त्यांच्या चरित्रांत मानवी व अतिमानवी सामर्थ्य यांचें इतकें मिश्र संमेलन आहे कीं, कोठे मानवी भाग संपतो व कोठे अतिमानवी भाग सुरू होतो हें लक्षांतहि येत नाहीं. रामाचें चरित्र एकंदर त्याच्या सत्वशीलतेमुळें आदर्श वाटावें यांत नवल नाहीं. त्याचें एकपतित्व एकबाणित्व एकवचनीपण इत्यादि सर्व गोष्टींत तत्कालीन मूल्यांच्या दृष्टीनें राम आदर्श वाटल्यास नवल नाहीं. रामाचें चरित्र कांहीं दृष्टीनें अतिमानवी वाटलें तरी मानवी कक्षेच्या टप्प्यांत पुष्कळसा भाग त्यांत आहेच. शिवाय कित्येकांच्या घरीं रामाची उपासना चालत आलेली असणे हेंहि एक कारण आहे. तथापि महाभारतापेक्षां रामायणाकडे एकंदर ओढा कमीच. याचें कारण म्हणजे विविधता, चमत्कृति, तत्त्वनीति, विवेचन इ. गोष्टींना रामायणांत स्थान कमी हें होय. रामायणांतला मराठी कवींना अधिकांत अधिक आकर्षक वाटलेला प्रसंग म्हणजे सीता स्वयंवराचा, त्या शिवाय रावणयुद्ध इ. प्रसंग आहेत पण काव्य परिपोषाच्या व रसवतेच्या अविष्करणाला व वर उल्लेखिलेल्या इतर गोष्टींना रामायणांत एकंदर अवसर कमीच.

त्या दृष्टीनें महाभारताचें महत्त्व अनन्य साधारण आहे. महाभारतांत पांडव व श्रीकृष्ण या दोहोंच्याहि मोठेपणास महत्त्व आलेलें आहे. तेव्हां यांपैकीं कोणाचेंहि वर्णन जरि अभिप्रेत असलें तरी महाभारताकडेच वळणे क्रमप्राप्त ठरतें. त्याशिवाय कृष्णाचा अवतार हा पूर्णावतार गणला जातो; कारण कृष्णाच्या जीवनांत रामाच्या जीवनांत असलेला नैतिक कडकडीतपणा कमी. त्या दृष्टीनें कृष्ण अधिक जवळचा वा मानवी असा सर्व समाजास वाटला तें योग्य आहे. पूर्व चरित्रांतला हा मानवीपणा सोडला तर कृष्णाचे चरित्रांत अतिमानवी अंशहि पुष्कळ आहे, त्यांत चमत्कृति आहे; भक्ति या भावनेच्या आविष्करणास तर वाव अमूपच आहे, व त्या योगेंच कवींना रामचरितापेक्षां कृष्णचरित्र अधिक जवळचें वाटलें.

काव्याच्या दृष्टीनें कृष्णचरित्र कितीतरी श्रेष्ठ आहे. कृष्णाच्या

बालपणापासून एकापेक्षां एक श्रेष्ठतर व आकर्षक प्रसंगांची जी एक अखंड मालिका दिसते, तिच्या योगें सर्वच प्रवृत्तींच्या कवींना कृष्णचरित्र जवळचें वाटावें असें तें आहे. कंसवध, राधाकृष्ण प्रेम, रुक्मिणी हरण, शिशुपालवध, जरासंधवध, द्रौपदीवस्त्रहरण, व प्रत्यक्ष भारतीय युद्धांत कृष्णाच्या कर्तृत्वास मार्गदर्शनास, असलेलें अपूर्व महत्त्व, या सर्वच दृष्टींनीं महाभारत हें निश्चितपणें श्रेष्ठ ठरतें. म्हणजे केवळ काव्यविषय होतील असे कितीतरी प्रसंग महाभारतांत आहेत व त्या योगेच महाभारत कवींच्या स्फूर्तीचें निधान झालेलें आहे.

रामायणापेक्षां महाभारताचें आणखी एक श्रेष्ठत्व आहे. भारतांतील तत्त्वविवेचन, नीतिविवेचन, नारदनीति, कृष्णनीति, विदूरनीति...इ. नीति प्रकरणें हीं आज आपणांस वाटतात त्यापेक्षां तत्कालिन समाजास अधिक जिवंत वाटलीं आहेत. भगवद्गीतेंतील तत्त्वज्ञानाच्या समीक्षणासाठीं तर ज्ञानेश्वरीचा अवतार झाला. हें जें तत्त्वविवेचन आहे यास अध्यात्मिक समता पुरस्कारण्याच्या दृष्टीनें अधिक महत्त्व आहे; व महाभारतांत त्यास भरपूर वाव आहे, हें महाभारताचें आणखी मोठेपण होय. सत्य व असत्य यांचा महाभारतांत जो अत्यंत नेत्रदीपक असा झगडा झाला आहे, तोहि कविमनाला व एकंदर त्या प्रकारची जाणीव असणाऱ्या व्यक्तीला भुरळ पाडणारा असा आहे. महाभारतांतल्या इतक्या विविध प्रवत्तींचीं पात्रें इतरत्र सांपडणें कठीण, व त्या सर्व पात्रांवर विशिष्ट अध्यात्मिक रूपक बसविल्यास किंवा त्या दृष्टीनें त्या पात्रांचें रेखाटन करण्यास कितीतरी वाव आहे. या सर्व विवेचनावरून एकंदर सर्व साधारण कवींचा महाभारताकडे का ओढा आहे याचा खुलासा होईल. काव्य, स्वभावपरिपोष, मानवीजीवितांतील सुख दुःखांचे प्रसंग, जीवनाला आवश्यक असणारें तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान नीति, पराक्रम वर्णन, उदात्तवर्णन, व भक्ति, या सर्वच बाबतींत महाभारत हें अपूर्व असल्यानें महाभारताचें जबरदस्त आकर्षण मराठी कवींना व समाजाला वाटावें यांत नवल नाहीं.

कथा काव्याचा दुसरा मोठा प्रयत्न म्हणजे श्रीधराच्या शिवलीलामृताचा. यांत श्रीधरानें शंकराला आदर्श मानलें आहे, व त्याचे मोठेपण त्यांत वर्णिलें आहे. गुरुचरित्र, हें दत्ताच्या उपासनेस वाहिलें आहे. पण असें प्रयत्न अपवादात्मकच. सर्वसाधारण अंतरंगांत महाभारताला जितकें खोलवर अधिष्ठान

आहे तितकें या ग्रंथास नाहीं. विशिष्ट संप्रदायाच्या लोकांत त्यांना धार्मिक महत्त्व आहे. सामाजिक व काव्यविषयक दृष्टीनें त्याचें महत्त्वमापन अद्याप व्हावयाचें आहे.

मराठी कथानक काव्याचें महत्त्व, व त्यांत रामायण, महाभारत यांचें स्थान कोणतें ह्याचा ह्या विवेचनानें उलगडा होईल, असें वाटतें. तेव्हां मराठी कथा काव्यें हीं केवळ काव्यग्रंथ म्हणून न अभ्यासतां, त्यांच्या ह्या सामाजिक, सांस्कृतिक, वैचारिक पार्श्वभूमीवरून अभ्यासावयास हवींत व तसें झालें तरच त्यांचें मोठेपण प्रतीत होईल. एरवीं आपल्या काळच्या काव्य-विषयक रसग्रहणाच्या मूल्यांनींच केवळ त्यांचें परीक्षण करूं गेलों, तर त्यांत कांहीं श्रेष्ठपणाचा भाग आढळला तरी त्यांचें खरें मोठेपण प्रतीत होणार नाहीं व म्हणून हें विवेचन केलें.

## सभापर्वाचें महाभारतांतील स्थान

भारतीय वाङ्मयामध्यें महाभारताचें स्थान फार मोठें आहे. 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' या शब्दसमूहानें प्रतीत होणारा अर्थ महाभारताचें वैशिष्ट्य स्पष्ट करणारा असाच आहे. 'कुशाग्र बुद्धि' मानवीस्वभावदर्शन.... प्रसंगसापेक्ष नैतिक गुणांचें तारतम्य विवेचन हीं महाभारताचीं वैशिष्ट्यें आहेत. 'भारतांतील प्रसंग, पात्रे, घटना व मानवी जीवनाची वत्सलता व भवितव्य यांचें विवेचन येथें अत्यंत सखोल, चौफेर, सूक्ष्म व सार्वत्रिक आहे.' "धर्माचा सूक्ष्मविचार महाभारतांत असून तो विचार फारच भव्य, रोमांच-कारी आणि गंभीर घटनांतून मोठ्या कौशल्यानें गुंफला आहे. अशा या भारतामध्ये सभापर्वाचें स्थान फार महत्त्वाचें आहे.

खांडववन दहनाच्या वेळीं जीवदान दिलेल्या मयानें विचारल्यावरून कृष्णानें त्यास सभामंडप उभारण्यास सांगितलें. तो सभामंडप इतका उत्कृष्ट झाला कीं त्याच्या निमित्त धर्मराजानें वर्षभर उत्सव केला. या उत्सव-प्रसंगीं नारदमुनी आले असतां त्यांनीं धर्मराजाला पंडूचा निरोप सांगितला. या निरोपाप्रमाणे पंडूला स्वर्गप्राप्ती करून देण्यासाठीं धर्मराजानें दिग्विजय करून राजसूय यज्ञ केला. अशा याप्रसंगीं कौरवांनाहि निमंत्रण होतें; ते पण ह्या उत्सवास आले होते. दुर्योधनाला पांडवांचें हें वैभव पाहून वैषम्य वाटलें. शिवाय तो मयसभा पाहण्यासाठीं मागें राहिला असतां त्याचा

द्रौपदी इत्यादि स्त्रिया हसल्यामळे अपमान झाला होता, व अशा अवमानित दाहक मनःस्थितींत तो हस्तिनापुरास आला; व झालेल्या अपमानाचें परिमार्जन कसें करावें ह्याचा इतरांच्या विशेषतः शकुनीच्या सल्ल्यानें विचार व तयारी करूं लागला. पांडवांसारखी दुसरी सभाच बांधून तेथें पांडवांशीं द्यूत खेळून त्यांना त्यांत पराजित करून विनायुद्ध पांडवाचें ऐश्वर्य आपल्या मालकीचें करूं इ. शकुनीचा सल्ला त्याला पटतो. धृतराष्ट्राची संमति पण त्याला मिळते. इच्छेप्रमाणें सर्व घडून येतें, पण त्यांत पांडवांची बेअब्रू अधिक करण्यासाठीं, व द्रौपदीनें केलेल्या अपमानाचा सूड घेण्यासाठीं भर सभेंत तिचें वस्त्रहरण करण्याचा प्रयत्न दुर्योधन दुःशासनाकरवीं करवितो, व त्यांतच त्याला अपयश येतें, त्यामुळे बाह्यात्कारी जरी सर्व यशस्वी झाल्यासारखे वाटलें तरी, पांडवांचा झालेला अपमान पांडव भरून काढल्याविना राहणार नाहींत ह्या कल्पनेनें सर्वच–विशेषतः धृतराष्ट्र आदि कौरव अस्वस्थ होतात, व अशा संमूढावस्थेंत असतांच सभापर्वाचा कथाभाग संपतो.

कथानकाच्या दृष्टीनें खरें सुसंबद्ध असें संविधानक येवढेच सांगतां येईल. पण महाभारतांत प्रामुख्यानें तीन लेखकांचें लेखन समाविष्ट झालेलें असल्यानें एका लेखकानें लिहिलें असतां जी सुसूत्रता आली असती किंवा असेल ती नष्ट झाली आहे व इतर कितीतरी कथानकें, उपकथानकें, वर्णनें आणि तत्त्वविवेचन हे सर्व प्रकार त्यामध्यें आले आहेत.

महाभारतांतील मध्यवर्ती घटना ज्या भव्य आणि रोमांचकारी प्रसंगांतून उद्‌भवल्या ते द्यूतसमारंभ आणि द्रौपदी वस्त्रहरण हे दोन प्रसंग सभापर्वातच आहेत. द्रौपदीवस्त्रहरण, हा तर सभापर्वाचा अत्युच्च बिंदूच होय. ज्या द्यूतामुळे पुढील सर्व अनर्थ ओढवले त्या द्यूताची कल्पना मयसभेमध्यें दुर्योधनाची जी फजीती झाली तीमधून कशी उद्‌भवली हें आपण पाहिलेंच. म्हणजे मयसभा व कौरवसभा येथें झालेल्या घटना भारतीय युद्धाला कारणीभूत झाल्या असें म्हणावयास हरकत नाहीं. या दृष्टीनें या प्रकरणाला ' सभापर्व ' हें नांव देण्यांत व्यासांची कल्पकता दिसून येते. मुक्तेश्वरालाहि आपल्या प्रतिभेचा विलास दाखविण्यास येथे भरपूर अवसर आहे. निसर्गवर्णन हें मुक्तेश्वराच्या लेखनशैलीचें वैशिष्टय आहे. सभापर्वात हें कौशल्य दाखविण्यास फारसा वाव नाहीं तरी इतर अनेक उत्तमोत्तम प्रसंगांचे मोठे मनोज्ञ

चित्रण मुक्तेश्वरानें येथें केलें आहे. प्राचीन मराठी कवि निव्वळ ' भाषांतरे आहेत असें विधान करणाऱ्यांनीं मुक्तेश्वराचे आदिपर्व आणि सभापर्व हीं दोन्हीं प्रकरणें नजरेखालून घालावींत म्हणजे मराठींतील कथा काव्याचा विलास किती रमणीय आहे हें त्यांना दिसून येईल. जरासंधवध, शिशुपालवध, द्यूतक्रीडा, पांडव दिग्विजय, राजसूय यज्ञांतील भोजनप्रसंग, द्रौपदीवस्त्रहरण यांसारखे भव्योदात्त प्रसंग मुक्तेश्वरानें मोठ्या तन्मयतेनें वर्णन केले आहेत; त्याचप्रमाणें भीम, द्रौपदी, धर्मराज, धृतराष्ट्र, विदूर, भीष्म, यांचीं स्वभाव-चित्रें अत्यंत सुस्पष्ट व रेखीव अशीच कवीनें रेखाटलीं आहेत. मयसभेचें नेत्रदीपक वर्णन तर अत्यंत आकर्षक असेंच झालें आहे.

प्रसंग व व्यक्ती यांच्या चित्रणाबरोबर आणखी एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट सभापर्वांत आहे, आणि ती म्हणजे विविध नीति प्रकरणें ही होय. नारदनीति, विदूराचा उपदेश, धर्मभीमसंवाद, भीष्मशिशुपालसंवाद इ. प्रसंगांनीं या प्रकरणाला भव्योदात्तता आली आहे. सभापर्वाचा हा एक विशेष होय. अशा या प्रसंग, व्यक्ति आणि नीतितत्त्वें यांचा परिपोष करणाऱ्या सभापर्वाला महाभारतांत फार महत्त्वाचें स्थान आहे हें सहज दिसून येईल.

## कविवर मुक्तेश्वर

श्री मुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ?
वंदी लक्ष जयाचें, यश ज्याचें भव्य जेवि मंदील.

सन्मिणिमाला—मोरोपंत.

प्राचीन कविमंडळांत कविराज मुक्तेश्वर हा आपल्या काव्यगुणांच्या तेजानें शुक्लासारखा चकाकणारा तारा आहे. ज्ञानेश्वरांनीं आपल्या प्रति-भेच्या कौमुदीमध्यें गीता श्लोकांची कुमुदे ' साविया ' केली आणि मराठी साहित्याचा बगीचा मधुर तत्त्वसुवासानें दरवळून सोडला. एकनाथांनीं तत्त्व आणि कथा यांचें मनोहर मिश्रण साधून रुक्मिणीस्वयंवरामध्यें जीव-शिवांचें लग्न लावून दिलें. एकनाथांनीं सुरू करून दिलेली कथाकाव्याची ही परंपरा मुक्तेश्वराच्या काव्यांत अगदीं कळसाला पोंचली. शांत आणि अद्भुत रसांनीं संपन्न अशा एकदेशीय मराठी साहित्यामध्यें शृंगार वीर करुणादि नवरसांचा मनोहर विलास मुक्तेश्वरानेंच प्रथम केला. "साहित्याच्या

व रसवत्तेच्या दृष्टीनें मुक्तेश्वर खरोखरीच अद्वितीय आहे...त्याच्या वाणींत साहित्याचें सौंदर्य, रचनाचातुर्य, रसिकता, उज्ज्वल प्रतिभा, व भाषेची प्रौढी आणि विनोदपरता हे गुण उत्कटत्वानें प्रकट झाले आहेत. त्याचें स्वभावरेखन व सृष्टिसौंदर्यवर्णन अतुलनीय आहे. मुक्तेश्वर हा राष्ट्रीय भावनांनीं उचंबळलेला असा कवि आहे. महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाल्यावेळचा हा दांडगा कवि आहे. " मुक्तेश्वरी भारताची चारच पर्वे उपलब्ध आहेत तरी तेवढ्याच साहित्यानें प्राचीन मराठी कथाकवींमध्ये त्याला अद्वितीय स्थान प्राप्त झालें आहे. मोरोपंतांशिवाय अन्य कोणताहि मराठी कवि त्याची बरोबरी करूं शकत नाहीं. "इतर भारत रचनाकारांनीं (मोरोपंताशिवाय) जीं ओवीबद्ध पर्वे लिहिलीं आहेत त्यांत वस्तुतः सारें गद्य आहे व खरें कवित्व विरळ आहे. त्यांत काव्यदृष्टि फार करून कोणांतहि नाहीं. अनंततनय त्र्यंबकानें मुक्तेश्वराला 'ओविकाकवीचा ईश्वर' म्हणजे ओवीबद्ध काव्यरचनेचा ईश्वर म्हटलें आहे तें यथार्थ आहे. भारतकर्त्या जीवाशिवानेंही त्याला 'काव्यरचना सौंदर्याच्या वैभवानें कविगणांत अग्रपद मिळविणारा 'श्रेष्ठ कवि' असें म्हटलें आहे." मोरोपंतांनी स्वतःच मुक्तेश्वराच्या भारताबद्दल खालील उद्‌गार काढले आहेत.

"मुक्तेश्वरकृत भारत आवडतें विठ्ठलासि कीं पर्व
सर्व श्रवणे हरितें आशा कविच्या आशेषही गर्व"

मुक्तेश्वराच्या काव्यगुणांचे अनेक रसिक टीकाकारांनीं विवेचन केलें आहे. महाराष्ट्र सारस्वतकार भावे यांनीं या कविश्रेष्ठाचें केलेलें वर्णन या प्रास्ताविक विभागांत येण्याचा मोह आवरत नाहीं इतकें तें मनोहर आहे. ते म्हणतात "ज्यानें एकदां मुक्तेश्वरी आदिपर्वातील आख्यानांचा स्वाद चाखला आहे, तो त्यांतील रसानें वेडा होऊन पुन्हां पुन्हां तेथेंच भ्रमत राहतो. वाहात्या पाण्याच्या धबधब्याचा धोत पाहून कोणाचे डोळे विटले आहेत ! गोड आम्रफळे खातां खातां त्यांची कोणाच्या जिभेला शिसारी आली आहे ? गंधर्वाच्या गाण्यानें आणि कोकिळेच्या स्वरानें कोणाच्या कानठिळ्या बसल्या आहेत ? आणि कपाळ उठलें आहे ? तसेंच मुक्तेश्वराचें गोड काव्य वाचीत असतां कोणाला त्याचा कंटाळा वाटला आहे ? शरदृतूच्या स्वच्छ चांदण्यांत चांदण्यानें न बोलावतां लोक जसें होऊन तिकडे जातात किंवा ढळ-

ढळीत उन्हांत दुपारच्या वेळीं झाडांच्या गर्द व शीतळ छायेंत आमंत्रणाची अपेक्षा न करतां स्वतः होऊन लोक जाऊन बसतात, किंवा जाई-मोगऱ्यानें विनवण्या केल्याशिवाय त्यांचा वास लोक एकसारखा घेतात, त्याप्रमाणें ज्याला सहृदयता आहे तो रसिक कोणीहि न विनवतां, न सांगतां, आग्रह न करतां आपण होऊन मुक्तेश्वराचीं गोड आख्यानें पुन्हां पुन्हां वाचीत सुटतो. आणि पोथी गुंडाळून ठेवल्यावरहि त्यांतील ओव्या एकसारख्या आपल्याशींच गुणगुणत राहतो. असा हा मुक्तेश्वर कवि लोकोत्तर आहे...'' सभापर्व वाचीत असतांना या मुक्तेश्वराच्या काव्यगुणांचा अनेक ठिकाणीं आपणाला प्रत्यय येतो. सभापर्व हें प्रामुख्यानें घटना प्रधान पर्व आहे. त्या त्या घटना जणूं कांहीं आपल्या डोळ्यापुढेच घडत आहेत असें तन्मयतेनें केलेलें वर्णन हें या पर्वाचें वैशिष्टच होय. व्यासांचा मागोवा घेत घेत मुक्तेश्वरानें संस्कृत महाभारताला देशी भाषेंत जें रम्य स्वरूप प्राप्त करून दिलें आहे तें मराठी भाषेला अलंकारभूत होऊन राहिलें आहे. "व्यास वाढितां जगातें। ग्रास लाधला जीर्ण कवीतें। त्यांचें मुखींचीं उच्छिष्ट शितें। म्यां दुर्बळें वेचिलीं' असें विनयपूर्वक सांगणारा मुक्तेश्वर आपल्या काव्याबद्दल आत्मविश्वासपूर्वक म्हणतो : "व्यास ग्रंथगिरीचें सोनें। संस्कृत खोटिये। गाळुनि मनें देशभाषा घडिलें लेणें। साहित्यरत्नीं सुजडित ॥'' इतर प्राकृत कवींना "सांडूनि व्यासाची संगती। चालो नये इतरपंथी।'' असें सांगणारा हा कवि आत्मविश्वासपूर्वक व्यासांची उणीवहि भरून काढतो. सभापर्वामध्ये पांडव वनाला चालल्याचें वर्णन करतांना मुक्तेश्वर म्हणतो "सगुण सुभद्रा यादवी। द्वारके धाडिली स्नेहभावी। सांगों विसरला व्यासकवी। परी म्यां स्मरण दिधलें ॥'' व्यासांच्या मूळ भारताला आपल्या रसिक वृत्तीनें मुक्तेश्वरानें मराठींत अत्यंत बहारदार असें रूप प्राप्त करून दिलें आहे. असा हा कवि श्रेष्ठ मराठी कवि मंडळांतील शुक्राचा ताराच आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. अशा या कविश्रेष्ठाचा जीवनविषय कविवृत्तांत त्यानेंच दिलेल्या त्रोटक माहितीवरून थोडाफार उपलब्ध झालेला आहे. पण एकंदरींत आपल्याकडील इतिहासविषयक अनास्था नेहमींप्रमाणे येथेहि पाहावयास मिळतेच.

# मुक्तेश्वर : चारित्रविषयक वृत्तांत

महाराष्ट्र सारस्वताला आपल्या रम्य काव्यशैलीनें विभूषित करणाऱ्या या कविश्रेष्ठाचा जीवनवृत्तांत फारसा उपलब्ध नाहीं. ओक, राजवाडे, पांगारकर, भिडे, अजगांवकर, प्रा. पंगू यासारख्या चिकित्सक टीकाकारांनीं आपापल्या परीनें मुक्तेश्वराच्या जीवनवृत्तांताला निश्चित स्वरूप देण्याचा बराच प्रयत्न केला आहे, आणि त्यावरून बरींच बळकट अनुमानें काढतां येतात.

कुरुंदवाड या पटवर्धनी संस्थान जवळील तेरवाड या गांवीं मुक्तेश्वरांची समाधि आहे. मुक्तेश्वरांच्या वंशांतील चौथ्या पुरुषानें कोल्हापूरकर शंभू-छत्रपतींकडून इ. स. १७२७ मध्ये जी सनद मिळविली आहे तिच्यांत पुढील उल्लेख आहे, "राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन्न आकाण्णा गोसावी, गात्र अत्री, वास्तव्य मौजे कुरुंदवाड--आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्रीएकनाथ स्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड येथे आहे." विख्यात संत एकनाथ यांच्या मुलीचा हा पुत्र होय. सभापर्वाच्या १७ व्या अध्यायांत मुक्तेश्वरानें खालील ओव्या लिहिल्या आहेत :

गोदावरीतट निवासी । अत्रिगोत्री पवित्र ऋषी ।
चिंतामणी गुणैकराशी । पासाव जन्म जयाचा ।।
तो मुद्गल चिंतामणि सुत । र्लाला विश्वंभर जगविख्यात ।
व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ।।

या ओव्यांवरून त्याच्या चरित्रविषयक माहिती मिळते. गोदावरीच्या कांठीं पैठण येथे चिंतामणी मुद्गल नांवाचा अत्रिगोत्री आश्वलायनसूत्री ब्राह्मण राहात असे त्याला एकनाथांची गंगाबाई नांवाची कन्या दिली होती. त्यांचा पुत्र म्हणजेच प्रख्यात कवि मुक्तेश्वर हा होय. ('मातृजनक जनार्दन एकनाथ नमियेला ।' असें मुक्तेश्वर आदि पर्वांत म्हणतात) तेव्हां त्याचें संपूर्ण नांव मुक्तेश्वर चिंतामणि मुद्गल हें ठरतें. कांहीं टीकाकारांच्या मतें 'मुद्गल' हें मुक्तेश्वराचें लहानपणचें नांव असून भारत रचनेच्यावेळीं त्यानें मुक्तेश्वर हें टोपण नांव गुरूच्या आज्ञेवरून धारण केलें. प्रा. वि. म. कुलकर्णी यांनीं मुक्तेश्वरी रामायणांतील 'द्विजवर कविनामा मुदगल अत्रि-

गोत्री ' या चरणाचा आधार घेऊन व प्राचीन कवि सहसा आपलें उपनांव काव्यांत देत नाहींत या प्रथेवरून या वरील मताचाच पाठपुरावा केला आहे. पण तो फारसा बरोबर वाटत नाहीं. संतचरित्रकार महिपती यांच्या लिखाणांत ' मुक्तेश्वर मुद्‌गल यांनीं ' भारतीं आळविला चक्रपाणी ' । असा स्पष्ट उल्लेख आहे. ' मुक्तेश्वर ' आणि ' मुद्‌गल ' या दोनहि नांवाच्या उल्लेखावरून एक व्यक्तिनाम व दुसरें उपनांव असलें पाहिजे असें स्पष्ट दिसतें.

' नमूं करवीर निवासिनी' व ' वंदू सोनारी भैरव. . . ' या सभापर्वातील ओव्यांवरून करवीरनिवासिनी जगदंबा व सोनारीचा बहिरोबा हीं त्याचीं कुलदैवतें दिसतात. परंतु एकनाथांचें आराध्यदैवत दत्तात्रेय हेंच मुक्तेश्वराचें आराध्यदैवत होतें (लीला विश्वंभर ईश्वरु । दत्तात्रेय जगद्‌गुरु ' स. प.१–६)

मुक्तेश्वर आपल्या काव्यांत ' लीलाविश्वंभर ' या पदाचा नेहमीं उल्लेख करतो. हे लीलाविश्वंभर कोण याबद्दल बराच वाद आहे. मुक्तेश्वरानें आपल्या मातापित्यांचाच उल्लेख ' लीला विश्वंभर ' या नावानें केला आहे असें पांगारकर , अजगांवकर, प्रा. पंगु इत्यादि टीकाकारांचें म्हणणें आहे. नाथांनीं आपल्या मुलीचें नांव आवडीनें ' लीला ' असें ठेविलें होतें' या लीलेच्या पतीला म्हणजे चिंतामणीला नाथ विश्वंभर म्हणत. सारांश हे लीला विश्वंभर म्हणजे मुक्तेश्वराचे आईवडीलच होत असें पांगारकर म्हणतात. अजगांवकरांनींहि मुक्तेश्वराच्या वंशजाजवळील वंशवृक्षाच्या आधारें त्याच्या वडिलांचें नांव ' चिंतामणि ऊर्फ विश्वंभर गोसावी ' असेंच दिलें आहे. प्रा. वि. म. कुलकर्णी यांनीं राजवाडे यांनीं दिलेल्या वंशावळींत व अजगांवकरांच्या वंशावळींत अनेक फेरफार आहेत असें दाखवून अजगांवकरांचा हा वंशावळीचा पुरावा कच्चा आहे असें म्हटलें आहे. प्रा. पंगूंनीं ' तो मुद्‌गल चिंतामणि सुत । लीला विश्वंभर जगविख्यात' (स. प. १७.) या ओवीवरून चिंतामणि म्हणजेच विश्वंभर असा निर्णय दिला आहे, परंतु हा अर्थ या ओवीवरून निघतोच असें दिसत नाहीं. तेव्हां लीलाविश्वंभर म्हणजे मुक्तेश्वराचे मातापिता असें समजण्यास आख्यायिकाखेरीज व अनुमानाखेरीज अधिक भक्कम पुरावा नाहीं. उलट लीलाविश्वंभर म्हणजे गुरुदत्तात्रेय असेंच मानण्याकडे प्रवृत्ति होते. सभापर्वांतील ' लीलाविश्वंभर ईश्वरू । दत्तात्रेय जगद्‌गुरु । ज्याचेनि नामे भवसागरु । मागां तरले असंख्या ।
(स. प.१–६)

या ओवीवरून या विधानालाच बळकटी येते. आदिपर्वातील ३३ व्या अध्यायाच्या शेवटल्या ओवींत ('चिन्मूर्ति लीलाविश्वंभरू । दत्तात्रेय जगद्‌गुरू । त्याचेनि नामे मुक्तेश्वरू । कथा बोले भारती ।। ) लीलाविश्वंभर म्हणजे सद्‌गुरु दत्तात्रेय असाच उल्लेख आलेला आहे. या बाबतींत सर्व साधक बाधक प्रमाणांचा विचार करून रा. पां. जि. सबनीस यांनीं आपल्या 'कविराज मुक्तेश्वर' या प्रबंधांत नमूद केलेलें मत प्रा. वि. म. कुलकर्णी यांनीं आपल्या सभापर्वाच्या प्रस्तावनेंत उद्‌धृत केलें आहे तेंच ग्राह्य वाटतें. "मुक्तेश्वराच्या वडिलांचें नांव फक्त चिंतामणि एवढेच होतें. मुक्तेश्वरांच्या हयातींत त्यांना विश्वंभर हें ऊर्फ नांव मुळींच प्राप्त झालें नव्हतें. तत्कालीन परिपाठाप्रमाणे 'लीलाविश्वंभर' व 'विश्वंभर' या पदांनीं मुक्तेश्वर आपल्या दत्तात्रेय श्रीगुरूंचेंच निदर्शन करीत आहे, मातापित्यांचें निदर्शन करीत नाहीं."

मुक्तेश्वराचा जन्म शक विवाद्य आहे. महाराष्ट्र सारस्वतकार भावे यांनीं कोडितकर अत्रे यांचे दप्तरांतील टिपणवही व सरंजामे यांची जंत्री यांतील लेखी पुरावा पुढे करून मुक्तेश्वराचा जन्मशक श. १५३१ (इ.स. १६०९) हा दिला आहे. रा. ओक यांनीं तंजावर येथील श्रीगोविंद बाळ स्वामींच्या मठांतील ग्रंथसंग्रहांत असणाऱ्या एका जुन्या हस्तलिखित वहींतील नोंदीवरून रा. भावे यांच्याच विधानाला पुष्टी दिली आहे. पण पांगारकर, चिंतामणराव वैद्य , प्रा. पंगू यांनीं मुक्तेश्वराचा जन्मशक श. १४९६ (इ. स. १५७४) हा दिला आहे. एकनाथांच्या प्रयाणकालीं मुक्तेश्वर २५ वर्षांचा होता. पांगारकर आणि भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांनीं दिलेलें मत गृहीत धरून प्रा. पंगूंनीं आपलें अनुमान काढलें आहे. अर्थात् भाषा स्वरूपाचा पुरावाहि त्यांनीं आपल्या आधाराला घेतला आहेच. नाथांचें प्रयाण श. १५२१ (इ. स. १५९९) या वर्षीं झालें. तत्पूर्वी २५ वर्षे म्हणजे श. १४९६ हाच मुक्तेश्वराचा जन्मकाळ ठरतो. मुक्तेश्वराच्या भाषेंतील जुन्या रूपांचा विचार करून अजगांवकरांनीं मुक्तेश्वर हे रामदासापेक्षां बरेच वडील होते असें मत दिलें आहे. रामदासांचा जन्मकाळ श. १५३१ (इ. स. १६०९ ) हा असल्यानें मुक्तेश्वर यापूर्वी बरींच वर्षे जन्मले असावेत असें त्यांचें अनुमान आहे. शिवकालांतील भाषेमध्यें दिसून येणारे फारशी शब्दांचें प्रस्थ मुक्तेश्वरामध्यें दिसून येत नाहीं-

उलट त्याच्या भाषेचें वळण एकनाथ कालाकडेच झुकतें हाहि प्रश्न महत्त्वाचा आहे. यावरून १५३१ व १४९६ या दोन शकांपैकीं मुक्तेश्वराचा जन्मशक १४९६ हाच असावा असा तर्क वाहतो.

## मुक्तेश्वरी भारताचा रचनाकाल

मुक्तेश्वरी भारताचा रचनाकाल ठरविण्याचे दृष्टीनें इ. राजवाडे यांचें पुढील विवेचन बरेंच उपयुक्त ठरणार आहे.

"मुक्तेश्वर आपल्या आदिपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत व सभापर्वाच्या आठव्या अध्यायांत 'क्रूर फिरंग्यांचा' व 'दंडेल्या इंग्रजांचा' उल्लेख करतो. इ. स. १६६० च्या सुमारास, इंग्रज लोक इ. स. १६३०।४० पेक्षां अधिक सभ्यपणा व माणुसकी दाखवूं लागले होते. यावरून वरील 'दंडेल' वगैरे वशेषणांना पात्र ठरण्याच्या काळीं, म्हणजे इ. स. १६६० पूर्वी त्यानें आपलें भारत रचिलें असावें. त्याचप्रमाणें मुक्तेश्वर जसा इंग्रज, पोर्तुगीज, डच, पठाण, इत्यादि परकीयांचा उल्लेख करतो, तसा तो फरेंच लोकांचा एकदासुद्धां उल्लेख करीत नाहीं. फरेंचांची पहिली वखार इ. स. १६६८ मध्यें सुरतेस स्थापली गेली. त्याअर्थी फरेंचांच्या आगमनापूर्वीच मुक्तेश्वरी भारत रचिलें गेलें असावें." राजवाडे यांनीं हा काल इ. स. १६५० हा दिल-आहे. पण त्यांच्याच "रामदासांच्या पुठ्ठ्यांतील कवींचीं नांवें मुक्तेश्वरी भारतांत नाहींत. तुकारामाचा नामोल्लेख नाहीं, फक्त ज्ञानेश्वर, एकनाथ व जनार्दनस्वामी यांचेच केवळ उल्लेख आहेत. तुकोबा इ. स. १६४९ सालीं स्वर्गाला गेले व त्यांची कीर्ति पैठणला जाण्यापूर्वीच मुक्तेश्वर आटोपले होते; या विधानावरून भारतरचनेचा इ. स. १६५० हा काल योग्य वाटत नाहीं. प्रा. पंगू यांचें या बाबतींतलें अनुमान एकंदरींत सुसंगत वाटतें. त्यांनीं भारता रचनेचा काल इ. स. १६४० हा दिला आहे.

## मुक्तेश्वराचा निधनकाल

इति. राजवाडे यांनीं इ. स. १६६० च्या नंतर लवकरच तो वारल असावा असें मत दिलें आहे. तुकारामाचा समाधिकाल इ. स. १६४९ हा आहे. ज्याअर्थी मुक्तेश्वराच्या काव्यांत कोठेंहि या घटनेचा उल्लेख नाहीं, त्याअर्थी तो यापूर्वीच म्हणजे इ. स. १६४५–४६ मध्येंच निवर्तला असला पाहिजे असें प्रा. पंगूंचें मत आहे.

## मुक्तेश्वराचें काव्य या दृष्टीने मूल्यमापन

प्राचीन मराठी कवींमध्यें कविराजमुक्तेश्वराचें किती अनन्य--साधारण महत्त्व आहे हें आपण प्रास्ताविक विवेचनांत पाहिलेंच आहे. मराठी कथा-काव्याला अत्यंत मनोहर रूप प्राप्त करून देणारा हा पहिला कलाकवि होय. आपली प्रतिभा व रसिकवृत्ति यांच्या साहाय्यानें त्यानें महाभारतांतील विविध घटना अत्यंत रसाळ अशा वाणीनें कथन केल्या आहेत. कल्पना-विलास आणि भावनोत्कटता यांचें मनोहर मिश्रण म्हणजे उत्कृष्ट काव्य हें काव्यप्रमुख लक्षण मानल्यास मुक्तेश्वराचें महाभारत हें एक श्रेष्ठ प्रतीचें काव्य ठरतें. महाभारतासारखे विशाल घटनाप्रधान कथानक काव्यविषय म्हणून निवडण्यांत मुक्तेश्वराच्या प्रतिभेची झेप किती दांडगी होती हें स्पष्ट होतें. सामान्य प्रतिभेच्या कवीला झेपणारें हें काम नव्हे. प्रचंड घटना विविध मानवी स्वभावाचें असंख्य नमुने, त्यांचें सूक्ष्म मनोविकार, सत्य असत्य, नीति अनीति यांसारख्या तत्वांचा भव्य संघर्ष, यासारख्या मानवी जीवनाला व्यापून टाकणाऱ्या विविध धाग्यानीं महाभारताचें हें महा-वस्त्र विणिलें आहे. मूळ संस्कृत कापसापासून हें मराठी महावस्त्र आपण निर्माण केलें आहे हें आत्मविश्वासपूर्वक सांगणाऱ्या मुक्ते-श्वराच्या प्रतिभेची धडाडी किती मोठी होती हें सहज दिसून येईल. मुक्तेश्वराच्या काळीं अद्यापि मराठीमध्ये ग्रंथ लिहिणे हें विद्वानांना मान्य झाल्याचें दिसत नाहीं. ज्ञानेश्वरांनीं आव्हानपूर्वक गीतेला मराठी साज चढविला तरी अद्यापि संस्कृताचाच श्रेष्ठपणा मानणारे पंडित होते असें दिसतें. अशा पंडितांना उद्देशून मुक्तेश्वर म्हणतो "संस्कृत कार्पास सुपवित्र । प्रमेय विणिलें भाषावस्त्र । माजी परमार्थ पटसूत्र । कनकतारा सद्‌गुणी ।। तेहे उचित ओपितों संता । कोण्ही पटचि ठेऊनि परता । कापुसें आच्छादिती माथा । हेंचि चातुर्य विचित्र ।" अशा प्रकारें व्यासांच्या संस्कृत भारतरूपी कापसापासून मराठीमध्यें महावस्त्र निर्माण केल्याचें सांगणाऱ्या मुक्तेश्वराचे ठिकाणीं प्रतिभेचें असामान्य सामर्थ्य होतें हें मान्य करावयास हवे. त्याच्या या असामान्य प्रतिभेची प्रतीति सभापर्वांत अनेक ठिकाणीं येते.

विशाल कल्पकता हा त्याच्या कवित्वाचा विशेष होय. सभापर्वामध्यें अगदीं प्रारंभींच मयसभा व इतर लोकसभा यांचें नेत्रदीपक वर्णन करतांना ही

त्याची कल्पकता दिसून येते. मुक्तेश्वराच्या प्रतिभेचा एक अत्यंत महत्त्वाचा विशेष म्हणजे त्याची वर्णनशैली होय. (मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीचें विवेचन स्वतंत्र विभागांतच केलें आहे.) पण सभापर्वांत निसर्गवर्णनाला अवसर नसल्यामुळे आपणांला हें मुक्तेश्वरी प्रतिभेचें वैभव पाहावयास मिळत नाहीं. तरी त्याच्या वर्णनशैलीच्या कल्पकतेची चुणूक या विविध सभांच्या वर्णनामध्ये दिसून येते. वरुण सभेच्या तेजाचें वर्णन करतांना कवि म्हणतो, "पूर्ण चंद्राचीं मंडळें । अपार उगवलीं एकेवेळे । कामाऊनि मुक्ताफळे । निर्वाळिलीं सुतेजे ।।" कुबेर सभेमध्ये भिंतीवर काढलेल्या चित्रांचें वर्णन मुक्तेश्वर कसें करतो तें पाहण्याजोगे आहे. "गाळोनि सौदामिनीचें पाणी । चित्रे रेखिलीं सूर्यकिरणीं ।" त्या चित्रांमधील राजहंस व मोर असेच रमणीय होते." "काढोनि मुक्ताफळांचे रस । तण वोतवे राजहंस । नीळरत्नांचे राजस । नीलकंठ शुकपक्षी ।।" ब्रह्मसभेचें असेंच अत्यंत मनोहर असें वर्णन कवीनें केलें आहे. त्या सभेचें वर्णन वाग्देवीलासुद्धां करतां येणार नाहीं असें कवि म्हणतो. "तेथील बोलतां प्रमाण । वाग्देवीनें घेतलें मौन । प्रभा अवलोकोनियां नयन । अंध होती इंद्राचे ।।" असंख्य चंद्रसूर्य अग्नि यांचें तेज एकत्र केलें असतां देखील तें या ब्रह्मसभेतील तेजापुढें काजव्याच्या तेजाप्रमाणे फिकें पडेल. ब्रह्मसभेंतील सुवासाचें वर्णन कवि असें करतो. "सेवितां सुस्वाद परिमळु । हरळु त्यागी मलयाचळु । वसंत होवोनिया आलिकुळ । फेरे घाली सभोंवतें ।।" अशी कितीतरी रम्य वर्णनें सर्वत्र विखुरलेलीं आहेत. या वर्णनांतील मुक्तेश्वराचा कल्पनाविलास हा अत्यंत आल्हाददायक आहे. वस्त्रहरणासारख्या नाटचपूर्ण प्रसंगीं द्रौपदीनें केलेला श्रीकृष्णाचा धावा अत्यंत भावपूर्ण असाच आहे. भावनोत्कट प्रसंगाचे वेळीं अलंकारांना फारसा अवसर असत नाहीं. अलंकारांतील कल्पनाविलासांनीं रसोत्कटता कमी होते. पण मुक्तेश्वराची योजकता इतकी चातुर्यसंपन्न आहे कीं अशा भावोत्कट प्रसंगीं त्याच्या कल्पनाविलासानें रसहानि न होतां उलट रसोत्कर्षच होतो. द्रौपदीच्या धाव्यामध्यें परमेश्वराच्या दशावताराविषयीं मुक्तेश्वरानें योजिलेल्या रूपकांत त्याच्या कल्पना विलासाचा अत्यंत रमणीय असा पैलू व्यक्त झालेला दिसतो. भावना आणि कल्पनाविलास यांचें इतकें बहारदार मिश्रण अन्यत्र क्वचितच पाहावयास मिळतें. रूपक, दृष्टांत, समाधि, व्यतिरेक, श्लेष इ. विविध अलंकारांची

त्यानें केलेली योजना त्याच्या रम्य कल्पकतेची साक्ष पटविते. (अलंकारांचे सविस्तर विवेचन सभापर्वातील प्रमुख रस व अलंकार या विभागांत केलें आहे.)

मुक्तेश्वराच्या कवित्वाचा दुसरा विशेष म्हणजे त्याची रसवत्ता हा होय. त्याचा आवडता रस म्हणजे शृंगार, पण सभापर्वांत शृंगाराला फारसा अवसर नाहीं. तरी वीर, रौद्र, करुण, शांत, हास्य इ. विविध रसांचा अत्यंत उत्कट असा परिपोष त्यानें सभापर्वामध्यें केलेला दिसून येतो. (याचे सविस्तर विवेचन 'सभापर्वातील रस व अलंकार' या विभागांत केलें आहे. वस्त्रहरण प्रसंगीं द्रौपदीनें श्रीकृष्णाचा केलेला धावा अत्यंत करुणरम्य असाच आहे. "तुझें व्यापकत्व काय झालें । माझें हृदय कां सांडिलें ।? एवढे निर्वाण कां मांडिलें ? । अहो ! कृष्णे जननिये ! ॥" या ओव्यांमधील कृष्णाचा माउली म्हणून केलेला उल्लेख कारुण्य व वात्सल्य या भावनांनीं अगदीं ओथंबलेला आहे. यापुढें द्रौपदीचा धावा ऐकून श्रीकृष्ण 'सतिव्यसनवारणासाठीं' तेथें धावून आला हा अद्‌भुत व शांत रसात्मक कथाभाग तितक्याच तन्मयतेनें मुक्तेश्वरानें वर्णिला आहे. भीम, जरासंध यांच्या युद्धाचें वर्णन करतांना व्यक्त होणारा रौद्ररस चित्त थरारून सोडणारा आहे. राजसूययज्ञप्रसंगीं शिशुपालानें केलेली कृष्णनिंदा ऐकून सहदेवाचा संताप झाला व तो मोठ्या आवेशानें शिशुपालाच्या वधार्थ सज्ज ठाकला. हें त्याचें आव्हान स्वीकारून शिशुपालहि संतापून उठला व श्रीकृष्णाची अग्रपूजा केल्याबद्दल धर्मराजाला दोष देऊन मोठ्या आवेशानें तेथून निघाला. या प्रसंगीं व्यक्त झालेला वीर रस अत्यंत आकर्षक असाच आहे. मय सभेमध्यें दुर्योधनाची झालेली फजीती वर्णन करून कवीनें हास्यरसाचीहि चुणूक दाखविली आहे.

विविध प्रसंगांचें आणि व्यक्तींचें यथातथ्य चित्रण हा तर मुक्तेश्वराच्या कवित्वाचा प्रमुख विशेष होय. वर्ण्य विषयाचें दृकचित्र (Visual Image), श्राव्यचित्र (Sound Image) आणि भावचित्र (Emotional Image) वाचकांच्या अंतःचक्षूपुढे उभे करून त्यांना त्या त्या प्रसंगाच्या वातावरणांत नेऊन सोडणारी किती तरी रम्य काव्यस्थळें मुक्तेश्वराच्या काव्यांत आढळून येतात. सभापर्वामध्यें अशा स्थळांची रेलचेल आहे. राजसूय यज्ञाचेवेळीं धर्मराजानें श्रीकृष्णाची अग्रपूजा करण्याचें ठरविलें. त्यामुळें शिशुपालादि कृष्णद्वेष्टयांचा मोठाच अपमान झाला. त्यांनीं यज्ञामध्यें विघ्न

उभारलें या प्रसंगाचें मोठें गंभीर असें वर्णन कवीनें केलें आहे. भीम-जरासंध यांच्या युद्धप्रसंगाचेंहि असेंच भव्य वर्णन त्यानें केलें आहे. द्यूतप्रसंगीं धर्मराज एका मागून एक डाव हरूं लागला; त्याचें सर्व वैभव लयाला चाललें; या प्रसंगाचें अत्यंत भीषण असें चित्र मुक्तेश्वरानें रेखाटलें आहे. या घटनेच्या पोटीं असलेली भीषण भवितव्यता अनेक दृष्टांतांच्याद्वारां कवीनें मोठ्या कौशल्यानें वाचकांच्या मनःचक्षूपुढे उभी केली आहे. रजस्वला आणि एक वस्त्रा अशा द्रौपदीला दुःशासन जेव्हां कौरवसभेमध्यें घेऊन येतो त्या प्रसंगाचें वर्णन तर कवीनें अत्यंत उत्कृष्ट असेंच केलें आहे. द्रौपदीच्या आकांतामुळें जागृत झालेलें कारुण्य, दुःशासनाच्या निर्लज्ज साहसामुळे उसळणारा संताप, सतीच्या शापानें सबंध कौरवकुलाचा नाश होणार या भवितव्यतेमुळे अंतःकरणांत उद्भवलेली भीति, धर्मराजाच्या सात्त्विकतेमुळें हृदयाचे ठिकाणीं जागृत झालेली उदात्तता, सभेमध्ये द्रौपदीनें भीमाकडे दृष्टि फेकल्याबरोबर त्याच्या मनाची झालेली तगमग पाहून वाटणारा विषाद इ. विविध मनोविकरांचा अंतःसृष्टींत कल्लोळ उसळतो. मुक्तेश्वराच्या कवित्वगुणांची या प्रसंगवर्णनामध्ये अगदीं परमावधि झाली आहे.

या विविध प्रसंगवर्णनाप्रमाणेच द्रौपदी, भीम, धर्मराज, दुर्योधन, धृतराष्ट्र, विदूर, शिशुपाल, भीष्म, इत्यादि व्यक्तींचीं स्वभावचित्रे अगदीं थोडक्या पण मार्मिक शब्दांत रेखाटण्यांत कवीनें चांगलेंच यश संपादिलें आहे. द्रौपदीला दुःशासनानें कौरवसभेत आणल्यावर ती क्रोधानें भीमार्जुनांकडे पाहते त्यावेळीं भीमाची झालेली स्थिति कवीनें अत्यंत समर्पक अशा शब्दांत वर्णिली आहे. भीमाची ती क्रुद्ध मूर्ति चटकन् डोळ्यापुढे उभी राहते. "क्षोभोनिया पद्मनयना । क्रोध दृष्टीं भीमार्जुना । अवलोकितां भीमसेना । हृदयस्फोट होतसे ॥ रगडोनिया अधर दांत । गदामुष्टीं घातला हात । येणे हे पायीं समस्त । निर्दाळीन ये काळीं ॥" "दुर्योधनानें जेव्हां द्रौपदीला येऊनि बैसे मांडीवरी । होयीं अंतुरी पट्टाची ।" अशी निर्लज्ज मागणी केली तेव्हां एकाद्या खवळलेल्या नागिणीप्रमाणे द्रौपदी चवताळून दुर्योधनाला प्रत्युत्तर देते, त्या वेळचे तिचे उद्गार तिच्या व्यक्तिमत्वाची धार व्यक्त करणारे असेच आहेत. याच प्रसंगींचे भीमाचें चित्रहि अत्यंत उत्कृष्ट असेंच रेखाटलें आहे. 'गदा उचलोनि भीमसेनू । हस्ततुळणा दावीतसे ॥ हेचि

जानू रणचत्वरीं । चूर्ण करीन गदाप्रहारीं । जैसा क्षोभल्या वज्रधारी । शृंगभंगी पर्वताचें । इ. ओव्यांमधून व्यक्त होणारा भीमाचा तडफडाट अत्यंत मार्मिकतेनें कवीनें व्यक्तविला आहे. सभेमधून उठून चाललेला शिशुपाल एका ओवींत मुक्तेश्वरानें वाचकांच्या डोळ्यापुढें उभा केला आहे. "ऐसें बोलोनि क्रोधदृष्टि । हातीं बसवी खड्गमुष्टी । घेऊनि राजयांच्या थाटीं । चैद्य तेथोनि निघाला ।। " अशा प्रकारें अत्यंत रेखीव अशीं कितीतरी व्यक्तिचित्रें मुक्तेश्वरानें अतिशय हळुवारपणे रेखाटिलीं आहेत.

निरनिराळ्या व्यक्तींचीं संभाषणे, त्यांतून उद्भवणारे नाट्यपूर्ण समरप्रसंग यांचेंहि चित्रण मुक्तेश्वर अत्यंत कौशल्यानें करतो. भीष्म–शिशुपाल संवाद, जरासंध–श्रीकृष्ण संवाद, दुर्योधन–धृतराष्ट्र संवाद, धर्मराज–भीम संभाषण, दुर्योधन-द्रौपदी उत्तर प्रत्युत्तर इत्यादि विविध संवाद संभाषणांमधून त्या त्या व्यक्तींचें अंतरंगदर्शन घडविण्याचें कलात्मक सामर्थ्य मुक्तेश्वराच्या प्रतिभेच्या ठिकाणीं होतें याचें प्रत्यंतर सर्वत्र येतें. भीष्मानें श्रीकृष्णाच्या अग्रपूजेचें समर्थन करणारें भाषण करतांना शिशुपालाची जन्मकथा सांगितली. त्याचा मृत्यु श्रीकृष्णाच्या हातूनच होणार असल्यामुळें इतरांनीं कष्ट घेण्याचें कारण नाहीं असें भीष्म सांगत असतां चवताळून शिशुपाल त्याला उत्तर देतो, " रे ! भाटा ! बंदीजना । किती वाणिसी गोंवळ्या कृष्णा ? ।. . . . .गाई राखितां जन्म गेला ।गोरसपानें आति माजला । गोवळीजन विटाळिला । चौढाळिला व्यभिचारें ।।" त्याच्या या उत्तराला भीष्महि तितक्याच आवेशानें प्रत्युत्तर देतो. दुर्योधनानें अधमपणानें, द्रौपदीला मांडीवर बसण्यासाठीं पाचारण केलें असतां ती त्याला जें उत्तर देतें तें असेंच न्याटच्यपूर्ण आहे. . . " दुरात्मिया ही वाणी । जळो तुझी पापिष्टा ।। प्रळयवीज माथा पडो । दृष्टि झडोनी जिव्हा झडो । कायेपासोनी प्राण विघडो ।। तात्कालिक पैं तुझा । " यावर दुर्योधन संतापानें बेभान होऊन " जिव्हा छेदा शस्त्रे । खंड विखंड करा गात्रें. . . " इत्यादि ओव्यांमध्यें जें भाषण करतो तेंहि अत्यंत नाटचपूर्ण असेंच आहे. सभेमधील हें नाटचपूर्ण प्रसंग जणूं कांहीं आपल्या डोळ्यापुढे घडत आहेत असें जिवंत चैतन्यमय वातावरण निर्माण करणारी संवाद व संभाषणें हें मुक्तेश्वराच्या लेखनशैलीचें वैशिष्टच आहे.

मुक्तेश्वराची लेखनशैली अशा प्रकारें चैतन्यानें रसरसलेली आहे. प्रसाद हा तिचा आत्मा आहे. विविध प्रसंगीं त्या त्या भावना उद्युक्त करणारीं मधुर, कोमल, कठोर, उग्र, ओजपूर्ण अशीं विविध रूपें ती धारण करते. द्रौपदीच्या विटंबनेचा प्रसंग वर्णन करितांना ती करुणामय बनते, द्रौपदीचा आवेश वर्णन करतांना उग्र बनते, धर्मराजाची धर्माचरणी वृत्ति वर्णितांना सात्त्विक बनते, शिशुपालाच्या, जरासंधाच्या वधाचें वर्णन करतांना रौद्र बनते. मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीच्या प्रवाहांत वाचक तन्मयतेनें वाहून जातात. वर्ण्य विषयांतील विविध प्रसंगांशीं वाचकांची वृत्ति एकरूप होऊन जाणें, ते ते प्रसंगानुकूल मनोविकार वाचकांच्या ठिकाणीं जागृत होणें हेंच कवीच्या यशाचें रहस्य आहे. मुक्तेश्वर या कसोटीला पूर्णपणें उतरतो हें निःसंशय.

मूळ भारतांतील प्रसंग अधिक खुलवून सांगणें अगर त्यांचा संकोच करणें याहि गोष्टी त्यानें अनेक ठिकाणीं केल्या आहेत. संक्षेप विस्ताराला आवश्यक असें कौशल्य त्याच्या ठिकाणीं भरपूर होतें.

मुक्तेश्वराच्या काव्यांतील प्रमुख दोष म्हणजे अनेक ठिकाणीं येणारीं अश्लील व ग्राम्य वर्णनें हा होय. या प्रकाराला रसिकता हें नांव देतां येणार नाहीं. राजसूय यज्ञांतील भोजनप्रसंगीं वाढत असतां द्रौपदीवर ओढवलेला प्रसंग व कौरवांनीं तिची केलेली हलकट थट्टा मुक्तेश्वराच्या अभिरुचीला डाग लावणारी अशीच आहे. त्याच्या इतरहि पर्वांमध्यें असले नमुने बरेच आहेत. या दोषांपासून त्याचें काव्य मुक्त होऊं शकत नाहीं.

कालविपर्यास हाहि एक दोषच होय. स्वकालीन सामाजिक घडामोडींचा उल्लेख करतांना असे कालविपर्यास होणें शक्य असतें. विशिष्ट मर्यादेपर्यंत ते चालूहि शकतात. पण एखाद्या प्रसंगीं अशा कालविपर्यासामधून हास्यास्पदता पदरीं येण्याचा प्रसंग उदभवतो. मुक्तेश्वराचें अनवधान या मर्यादेपर्यंत येऊन पोंचलेलें कित्येक वेळां दिसतें. दिग्विजय प्रसंगीं पांडवांनीं जिंकलेल्या राजे लोकांत इंग्रज, फिरंगी या सारख्या जातींचाहि तो उल्लेख करतो; अगर द्रौपदीच्या धाव्यांत श्रीकृष्णानंतरच्या बौद्धावताराचाहि तो उल्लेख करतो.

अशा सारखे कांहीं दोष सोडल्यास मुक्तेश्वर हा प्राचीन मराठी कथाकवींमध्यें अत्यंत मोठा कवि होता हें मान्य करावयास प्रत्यवाय नसावा.

कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या रसिक पंडितानें मुक्तेश्वराचा फारच मोठा गौरव केला आहे. अगदीं थोडे पंतअभिमानी सोडून राजवाडे, भावे, पांगारकर, अजगांवकर, आदि विद्वान् टीकाकारांनीं मुक्तेश्वराला मोरोपंतांच्या वरचें स्थान दिलें आहे. "ऐतिह्य प्रतिभा, नैतिह्य विषय व ऐतिह्य छंद" या त्रयीची जेव्हां सांगड घडावी तेव्हां ऐतिह्य काव्य निर्माण होतें. मुक्तेश्वराच्या भारतानें जो ऐतिह्य ठसा वाचकांच्या मनावर उठविला जातो तो मोरोपंतांच्या भारतानेंहि उठत नाहीं. मोरोपंतापेक्षां मुक्तेश्वर कविप्रतिभेच्या दृष्टीनें जो मोठा भासतो त्याचें मुख्य कारण हें आहे. महान् युद्धाची घनगर्जना व लहानशा चकमकींतील शस्त्रांचा खणखणाट ह्यांतलें जें अंतर तेंच मुक्तेश्वराच्या ओवींत व मोरोपंताच्या आर्येत भासमान होतें ! !" (राजवाडे) पांगारकरांनीं मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्या काव्याची तुलना फार सुंदर केली आहे. ते म्हणतात : "मुक्तेश्वराची प्रतिभा, कल्पना, वर्णन चातुर्य, सृष्टयांवलोकन, बुद्धीची व्यापकता व राष्ट्रीय भावना हे गुण अनन्य साधारण असल्यामुळें मुक्तेश्वराची कवित्वाच्या दृष्टीनें कोणताही मराठी कवि बरोबरी करूं शकणार नाहीं असें मला वाटतें. मुक्तेश्वराच्या वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजस्विता व सृष्टिसौंदर्य वर्णनाची अनुपम शोभा दृष्टीस पडतात. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारती आख्यानांची महानदी 'खळखळाट' वाहविली आहे. पंतांनीं दुतर्फा मनोहर घाट बांधून जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे. मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी तेजस्वी, साधीभोळी, काळीसांवळी, मोकळ्या मनाची व सशक्त अशी आहे व मोरोपंतांची कविता ही सुस्वरूप, टापटिपीची व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे ! दोन्ही संपन्न, शुचि व ईश्वरपरायण आहेत. पहिली वाटेल त्याला भुलविते, दुसरीला भुलणारा सुविद्य नागरिकच पाहिजे. पहिलीच्या अंगावरचीं वस्त्रे उंची आहेत पण तीं कशीबशीं घेतलीं आहेत, दुसरीच्या वस्त्रालंकारांत नीटनेटकेपणा विशेष आहे. पहिली आपल्या काळ्या पाणीदार डोळ्यांनीं व सहजविलासांनीं मोहवील, दुसरी नानाविध चेष्टांनीं जिंकील. पहिलीची निर्भय-धिटाई व दुसरीची मर्यादशीलता,

पहिलीचें अकृत्रिम हास्य व दुसरीचें मंदस्मित, पहिलीचें सहजप्रेक्षण व दुसरीचे कटाक्षक्षेप, पहिलीचा आडदांडपणा व दुसरीचा संभावितपणा दोन्ही आपापल्यापरी मनमोहकच आहेत ! तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां 'दुरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः' या दुष्यंताच्या वचनाचें स्मरण होतें !...."

## मुक्तेश्वराची वर्णन शैली

मुक्तेश्वरास आद्य महाकवि म्हणून गणण्याचा प्रघात आहे व तो पुष्कळसा साधार आहे. त्याचे ठायीं कल्पकता, मानव व्यवहाराचें व मनोव्यापाराचें मार्मिक अवलोकन, भाषाप्रभुत्व..इ. गुण पुष्कळ प्रमाणांत वसत आहेत याची साक्ष या सभापर्वात पदोपदीं पटते. परंतु महाकाव्यांत वर्णनांना प्राधान्य अधिक असतें, कारण घटना भव्य असली तरी एकंदर कथानकांतील गतिशीलता अगदीं अल्प असते. कवीचा रोख व कविप्रतिभेच्या आविष्करणाचा भर हा वर्णनांवरच अधिक असतो व म्हणून महाकाव्यांतले सर्ग हे प्रामुख्यानें वर्णनप्रधान असतात. माघानें तर एका सबंध सर्गात केवळ सूर्योदयाचें वर्णनच फक्त केलें आहे.

याचें कारण एक प्रकारचा संकेत. संस्कृत साहित्यशास्त्रप्रणित नियमानुसार महाकाव्यांतून कांहीं विशिष्ट वर्णनें आलींच पाहिजेत असा आग्रह असतो. मध्य रात्र–अंधारी व चंदेरी, सूर्योदय, सूर्यास्त, माध्यान्ह, बन, सौध, नगरें, यांचीं वर्णनें मुत्सद्यांची खलबतें, सैन्यांच्या हालचाली व लढाईचें वर्णन, ह्या सर्व गोष्टी वर्णनांचे दृष्टीनें याव्यात असा संकेत आहे. याही संकेताप्रमाणे वर्णनालाच प्राधान्य प्राप्त होतें.

प्राचीन मराठी कथा कवींची साहित्यविषयक मूल्यें हीं संस्कृत कवि प्रणितच असल्यानें, त्यांनीं आपलीं काव्यें व विशेषतः महाकाव्यें त्यांनुसार लिहावींत हें क्रमप्राप्तच होतें. त्या दृष्टीनें त्यांच्या महाकाव्यांतून वर्णनालाच महत्त्व असावें ह्याहि पण गोष्टीचा उलगडा होऊं शकतो. मुक्तेश्वराचें महाभारत ह्या नियमास अपवाद असणें शक्य नाहीं. कविप्रतिभेचें अव्वल दर्शन घडविणारीं साधनें म्हणून सर्वसाधारण लोक काव्यांतर्गत वर्णनाकडे पाहात आले आहेत. अशा प्रकारच्या वर्णनांतून मुक्तेश्वराचें थोरपण कसें प्रतीत होतें तें पाहूं.

मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीचे उत्कृष्ट नमुने त्याच्या आदिपर्वातून व वनपर्वातून दिसून येतात. प्रस्तुत पर्वांत एकंदर नागरी व्यवहारांचें वर्णन प्रामुख्यानें आलें असल्यानें त्यांत निसर्ग वर्णनांत जी एक सहजसुंदर भव्यता असते ती येथें प्रतीत होत नाहीं. पण त्या बरोबर वेगळीच शोभा त्यांत आहे. निसर्ग वर्णनें हीं संस्कृत संकेतानुसार नुसतीं उत्प्रेक्षाप्रधान असतात. आपल्या रुचीस उतरेल असा भाग त्यांत एकंदरीनें कमी.

दुसऱ्या अध्यायांत मुक्तेश्वरानें जे मयसभेचें वर्णन केलें आहे तें त्याच्या शब्द प्रभुत्वाची, कल्पना वैभवाची व सूक्ष्म अवलोकनाची थोरवी पटविण्या-इतकें घवघवीत आहे. मुक्तेश्वर किती बहुश्रुत कवि होता याचें हें वर्णन म्हणजे उत्कृष्ट गमक आहे. मयसभेसाठीं आणलेलीं रत्नें दिल्यानंतर 'अष्ट-मुक्ताफळांच्या जाती। मेघ मच्छ सर्प हस्ती। वंश शंख वराह शुक्ति। यां पासव जे होती॥' असें मोत्यांचें वर्णन केलें तें तत्कालीन एतद्विषयक संकेतावर प्रकाश पाडतें.

जांबूनदाचे तुळवट। गरुड पाचूचे किलचापाट।
परोजांचे उंबरवट। कनकोदकें चित्रिले॥
पुष्परागाच्या सुरेखा। चौकटी जडल्या अमोलिका।
माणिकाच्या विनायका। अष्टभुजे वरौते॥

ह्या व यानंतरच्या ओव्यांतून त्या सभेत जे निराळे प्राणी, पुतळे केले होते, त्यांतून, तसेंच निरनिराळ्या पुराणातील व शास्त्रांतील वेचक दृश्यें तेथे चित्रिलीं होतीं, त्यांतून, तसेंच भव्य स्नानगृहें, निरनिराळीं सरोवरें, त्यांतील फुलें, भ्रमर, वृक्ष...इत्यादि गोष्टींनीं मंडित असलेली ती

सभा अवलोकितां दृष्टीं। शोभासमुद्र हेलावे सृष्टीं।
चक्षु पोहणार उठाउठी। ऐलकाठीं चुबकळले॥

यानंतर निरनिराळे ऋषी, त्यांचीं वैशिष्टचे इत्यादि पण हृद्य आहेत. मयसभेसारख्या आणखी दोन सभा या ठिकाणीं आल्या आहेत. पण वर्णनांच्या दृष्टीनें प्रत्येकीचें वैशिष्टच वेगळे आहे. पहिल्या मयसभेत मानवी व्यवहार घडत नाहींत त्यामुळें तिच्या पार्थिव वैभवाच्या वर्णनांत कविप्रतिभेला उदात्त रस वाटावा हें स्वाभाविक आहे. राजसूययज्ञ सभा ही त्या दृष्टीनें वेगळीच. तिच्यांत निरनिराळ्या व्यक्ति व त्यांची बोलणींचालणीं यांना महत्त्व होतें.

र।जसूय यज्ञसभेत कवीनें कृष्णवर्णनास प्राधान्य दिलें आहे. हें वर्णन किंचित् वेगळ्या प्रकारचें आहे हा उल्लेख पूर्वी आलाच आहे. कृष्णवर्णनांत कवीला भक्तीचें सुख लागत असल्यानें तेथें कवि बराच रमला आहे.

द्यूत सभेच्या वर्णनांत कवींच्या ठायींची नाटयात्मकता दिसून येते. विशेषतः द्यूताचें वर्णन फारच बहारीचें झालें आहे. बावीस डावपर्यंत ज्या गोष्टी धर्मराजानें पणास लावला त्या सर्वच गोष्टींचें वर्णन येथें थोडया पाल्हाळानें आलें आहे. तरी पण तें कंटाळवाणें होत नाहीं हें विशेष होय. धर्मराज हरला जात असतां, त्याच्या दिव्य अतुलनीय संपत्तीचें जें दर्शन होतें, तें कवीनें इतकें ठसठशीतपणे केलें आहे कीं, त्याच्या पार्श्वभूमीवर होत असलेली करुण घटना अधिक भयानक वाटतें.

व्यक्ति वर्णन कवि किती थोडक्यांत व समर्पक करतो याचें प्रत्यंतर, धर्मराजानें स्वतःचें बंधू व पत्नी यांना पणास लावले तेव्हां जे वर्णन केलें त्यांत येतें. धर्मराजाचें गाढ बंधु व पत्नीप्रेमहि त्यांतून दिसून येतें व त्यामुळें करुणाची छटा अधिक गर्द होते.

समाजव्यवहाराचें म्हणून आणखी एक वर्णन सभापर्वांत आलें आहे, व तें म्हणजे भोजनविधीचें. राजसूय यज्ञप्रसंगीं धर्मराजानें खातेवाटणी केली असते, ती, पण त्यापेक्षां प्रत्यक्ष पदार्थ व ते वाढले जाण्याची पद्धति इत्यादि वरून महाभारत काळापेक्षां मुक्तेश्वर कालच पुढें उभा आहे असें वाटतें.

याशिवाय दिग्विजय वर्णनाच्या अध्यायांत निरनिराळे राजे, त्यांचे पांडवांना संतृप्त करण्याचे मार्ग, त्यांनीं दिलेले करभार,. . . या सर्व गोष्टींचें— अत्यंत विस्तारपूर्वक वर्णन आलें आहे. त्यांत आपणांस तितकी गोडी वाटत नाहीं कारण तें बहुतेक यादीवजा आहे. तथापि कीर्तनाच्या तंत्रांत तसल्या वर्णनास विशेष स्थान आहे. आणि आपल्या इतकें तत्कालीन लोकांस तें नीरस वाटलें नाहीं, शिवाय त्यांत कवीचें महाभारतकालीन व स्वकाळांतहि राजे इत्यादि संबंधींचें ज्ञान व्यक्त होतें.

युद्धवर्णनें हा एक भाग असतो, त्या दृष्टीनें प्रस्तुत पर्वांत जरासंध-भीम युद्ध व शिशपालवध हीं दोन प्रकरणें आहेत. दुसऱ्यांत युद्ध या दृष्टीनें विशेष रस नाहीं. पण पहिलें मात्र कवीच्या ठिकाणचें कवित्व जागें करतें. जरासंध, भीम यांची एकमेकांवर कुरघोडी करण्याची ईर्षा, त्यांचे हावभाव इत्यादि

गोष्टी यथातथ्य उतरल्या आहेत. खजुरीचें पान फाडून कृष्णानें जरासंधाचा वध कसा करावा हें भीमास सांगितलें असा प्रवाद आहे व तो मुक्तेश्वरानें दिलाही आहे. पण भारतकारांना तो मान्य नाहीं असें तो म्हणतो.

निसर्गवर्णनांना या पर्वांत स्थान नसल्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. कृष्णाचीं वर्णनें मधून मधून येतात. राजसूय यज्ञवेळीं व कृष्णाचा धावा द्रौपदीनें केला ते वेळीं कवीनें या वर्णनांत पुनरुक्ति होऊं दिली नाहीं हें त्याचें मोठेपण आहे.

कवीच्या वर्णनशैलींतली विविधता दिसून येण्याइतके निरनिराळे प्रसंग या ठिकाणीं आले आहेत. विदूर शकुनी यांचे संवाद भीष्म शिशुपाल संवाद... इत्यादींतूनहि कवि प्रतिभेचें दर्शन होतें हें आपण मागे पाहिलेंच आहे. परंतु प्रामुख्यानें वर्णन हाच कवीचा स्थायी गुण वाटतो. आणि या सर्व पर्वांत उत्कृष्ट वर्णनाचा कोणता भाग असेल तर मयसभेचें वर्णन हाच ठरेल असें वाटतें. वैभवाचें, ऐश्वर्याचें इतकें भव्य वर्णन इतरत्र सांपडणें कठिण. पुनः पुनः वाचावें इतकी रम्यता व भव्यता त्यास आली आहे. चित्र डोळ्यांपुढे उभे करण्याची कवीची हातोटी अजब आहे.

भविष्यकालीं दुर्धर घटना घडणार आहेत त्यांची सूचक म्हणून वर्णनें व उल्लेख वारंवार येतात. धर्मराजासारखा सत्त्वशील पुरुष क्षणभर संभ्रमित होऊन जातो; परंतु "विचित्रगती प्रारब्धाची कळेना । ईश्वर निष्ठुर कीं कृपाळु । काय केवि करील काळु । याचा निश्चय विवेक कुशळु । करूं नेणें सर्वथा ।।" असें व्यासांनींच सांगितलें असल्यानें निर्धाराने सर्व गोष्टींना तोंड देणें क्रमप्राप्त ठरतें. प्राचीन वर्णनसंकेत या दृष्टीनें हीं वर्णनेंहि लक्षांत घेणें आवश्यक आहे. १७ व्या अध्यायांतील अशा प्रकारच्या वर्णनांनीं सभापर्वाचा शेवट मोठा गंभीर आणि भवितव्यतेची भयानकता सुचविणारा असा झाला आहे. प्रारंभीं विदूर धृतराष्ट्राला पांडव वनामध्ये कसे कसे गेले याची माहिती सांगतो. वस्त्रांनीं मुख आच्छादन करून धर्म गेला, भीम त्याच्या मागून "उभारूनि भुजा सरळी । अवलोकीत क्रोधानळीं । हुंकार करीत महाबळी" असा गेला. अर्जुन डाव्या मुठींत वाळू घेऊन सर्वत्र ती विखुरीत गेला. सहदेवानें आपलें मुख चिखलानें माखून घेतलें होतें, नकुळानें सर्वांगच मातीनें चर्चून घेतलें होतें; द्रौपदी आपल्या हातांनीं आपले केस

मोकळे सोडीत गेली, आणि त्यांच्या मागून धौम्यऋषी अंत्येष्टीचे मंत्र म्हणत हातांत दर्भाची जुडी घेऊन चालले होते. या वर्णनांनीं मनावर विलक्षण खिन्नता प्राप्त होते. पांडवांची ही स्थिति पाहून सर्व नगरी शोकसागरांत बुडाली. सर्वत्र उत्पात सुरू झाले. मुक्तेश्वरानें केलेलें या उत्पातांचें वर्णन जरी सांकेतिक असलें तरी अत्यंत ठसठशीत असेंच उतरलें आहे. उत्पाताच्या वर्णनांना योग्य असेच शब्द त्यानें वापरले आहेत. "रक्त वृष्टि वन्हिवृष्टि । थरथरा कांपिन्नली सृष्टी । उल्कापात कडकडाटी । तुटोनि पडलें भूतळीं ।। झडझडाटें प्रळयवातू । सुटला उदेला त्रिविध केतू । कृतांत भुकेला खातखातू । भक्षीन म्हणे विश्वातें ।।" अशा प्रकारें अत्यंत भव्य, नेत्रदीपक, वैभवशाली, अंतःचक्षुपुढे वस्तुप्रतिभा उभी करणारीं अशीं विविध प्रसंगांचीं, विविध व्यक्तींचीं, विविध दृश्यांचीं, विविध मनोविकारांचीं मनोज्ञ वर्णनें हा मुक्तेश्वराच्या काव्याचा विशेष होय.

## सभापर्वांतील कांहीं विशेष प्रसंग व वर्णनें

### (१) मयसभा व द्यूतसभा

सभापर्वामध्ये मयसभा, लोकपालसभा, राजसूययज्ञानिमित्त झालेली सभा व शेवटीं द्यूतसभा अशा अनेक सभांचीं वर्णनें येतात. या अनेक सभांपैकीं दोनच सभा खऱ्या महत्त्वाच्या आहेत. सर्व भावी घटनांची बीजें मयसभा व द्यूतसभा या दोन प्रमुख सभांमध्ये सांपडतात हें आपण मागे पाहिलेंच आहे. या दोन्ही सभांचा संबंध कार्यकारण भावरूपी आहे; म्हणजे एकींतून दुसरी निर्माण झाली आहे. या दोन सभांचें परिशीलन करणें कांहींसें उद्बोधक आहे.

मयसभा ही पांडवांच्या वैभवाची निदर्शक आहे तर द्यूतसभा ही कौरवांच्या वैभवाची निदर्शक आहे. पांडवांचें वैभव वर्णन करण्यांत कवीला रस वाटतो, कारण तें सत्य, न्याय, धर्म. . . इ. च्या बाजूचें देवांचें वर्णन आहे. उलट कौरवांची सभा ही अधर्मद्योतक असल्यानें तिच्या वैभवाचें वर्णन वा गुणगान करण्यासाठीं आपल्या वाचेस शिणवावें असें कवीस वाटत नाहीं. कवीची भूमिका अशी संकेतानुसारी असल्यानेंच द्यूतसभा वर्णनास संकोच मिळाला आहे. काव्यहेतूविषयक संकेताचे दृष्टीनें हा मुद्दा लक्षांत घेण्या-

सारखा आहे म्हणजे जेथें न्याय, नीति, धर्म, देव, इत्यादि आहेत तेथेंच कवीच्या वाणीस अवसर आहे हा जुन्या कवींचा संकेत येथे प्रत्ययास येतो.

परंतु आपल्या दृष्टीला तरी काव्य वा एकंदर कृतिशीलता या दृष्टीनें मयसभेपेक्षां द्यूतसभाच अधिक आकर्षक वाटते हा पहिला विरोधाचा मुद्दा; म्हणजे मयसभा व द्यूतसभा या राजसभा खऱ्या, पण मयसभा ही रचनेच्या दृष्टीनेंहि शिथिल व स्थिर सभा वाटते तर द्यूतसभा ही कितीतरी जिवंत वाटते. पहिल्या सभेंत ब्राह्मणांना देकार व भोजन ब याशिवाय कोणत्याच घटना घडत नाहींत. उलट दुसरींत घटनांची एक सुसूत्र अशी परंपराच दिसून येते. द्यूताला शकुनीनें सुरुवात केली असतां विदूर म्हणतो " हे निंद्य करणी । पुण्यश्लोका अयोग्य । विष्णस्मरणीं हरिकीर्तनीं । वेळ क्रमिजे पवित्र-जनीं ।" कारण " द्यूत म्हणजे भ्रष्ट व्यसन । द्यूतें पाविजे महाविघ्न । पाश अपवित्र सज्जन । सहसा हातीं न धरिती ।" परंतु विदुराचा उपदेश अप्रभावी ठरला, व द्यूतास सुरुवात झाली. पण कवि म्हणतो, "प्राप्त झालिया कळिकाळ । पुण्य निर्बळ पाप सबळ । तेवीं विदुरा हेळोनि खेळ । द्यूत बळे मांडिलें ।।" याउलट मयसभेत 'दशसहस्र ब्राह्मणोत्तम । भोजनतृप्तीं केलें परम । हेमपात्रीं अमृतोपम। भक्ष्यभोज्यें वोपिलीं ।। एकएकातें सहस्र धेनु । सवत्स सालंकार सगुण । ' इत्यादि गोष्टी घडल्याचा कवीनें साभिनिवेश उल्लेख केला आहे.

कवीच्या भूमिकेशीं समरस व्हायचें तर विरोधाचा असा एकच मुद्दा विचारांत घ्यावयास हवा, व तो म्हणजे, मयसभाही, सत्पशीलतेची, धर्म, नीति, न्याय यांची द्योतक आहे, म्हणूनच कवि तिच्यांत अधिक आपलेपणानें रंगला. या उलट द्यूतसभा ही असत्यावर आधारलेली, तामसी वृत्तीला विजय प्राप्त करून देणारी, अधर्म, अनीति, यांना प्राधान्य देणारी अशी आहे. म्हणून तिचें वर्णन अपरिहार्य असलें तरी, तरी त्याचें प्रयोजन अगदीं वेगळें असतें.

आपणांस ह्या विरोधास विशेष महत्त्व देण्याचें ह्या ठिकाणीं तरी कारण नाहीं, कारण तो सर्वस्वी स्वतंत्र असा विषय आहे. त्याची व्याप्ति कांहीं सभापर्वाइतकीच नाहीं. सबंध महाभारतासंबंधीच्या चर्चेचा तो एक भाग होऊं शकेल.

रचनासौष्ठवाचे दृष्टीनेंसुद्धां हाच फरक आढळतो. मयसभादर्शनांत

उदात्त अलंकारांत वजा होईल असें वर्णन खूप आहे. पण मुख्य प्रसंग म्हणजे, ब्राह्मणांचें भोजन.धर्मानें दान केल्यानंतर नारदमुनींचें अवतरण होतें हा तिसरा प्रसंग--काव्य दृष्टीनें ह्या प्रसंगांत सुसूत्रता काडीचीहि नाहीं. उलटपक्षीं द्यूतसभेतील घटना सुसूत्र वाटतात. सभा ऐश्वर्यांत काळ जात नाहीं तेव्हां काय करावें ही दुर्योधनाची पृच्छा व तिला शकुनीचें उत्तर, आणि शेवटीं द्यूताचा आग्रह; पुढे पांडवांची द्यूताला मिळालेली संमति; नंतर प्रत्यक्ष द्यूतवर्णन व शेवटीं कौरवांस चढलेला विजयोन्माद, व त्यांतून निघालेला वस्त्रहरणाचा प्रसंग इत्यादि घटनांमुळें रचनेच्या सुसूत्रतेच्या दृष्टीनेंहि द्यूत सभाच आकर्षक वाटते.

परंतु त्यापेक्षां अत्यंत महत्त्वाचा विरोध म्हणजे, मानवी मनाचें आविष्करणांतील भेद. मयसभा ही मानवी नाहींच. अतिमानवी अशा प्रकारचा धर्मराज व त्याच्या सत्कृत्यांचें सात्त्विक वर्णन हाच तेथील महत्त्वाचा भाग. उलट द्यूतसभेंत मानवी मनाला भुरळ पाडणारे, मार्ग दाखविणारे, दुःख देणारे, असे अनेक प्रसंग आहेत. हर्ष, विमर्ष, राग, द्वेष, लोभ, ईर्षा, प्रेम, इत्यादि सर्वच भावनांचें फार मनोज्ञ आविष्करण झालें आहे. द्यूतसभेचें काव्यदृष्टचा खरें वैभव हेंच व ह्या तिच्या असामान्य मोठेपणानें तो प्रसंग, स्वतंत्र, नाटकांचा, काव्यांचा विषय होऊं शकला. पुत्रमोहानें अंधळा झालेला धृतराष्ट्र, पांडवांची संपत्ति पाहून मनांत चडफडणारा दुर्योधन, ती विनासायास कशी हस्तगत करतां येईल हा सल्ला देणारा शकुनि, विजयानें उन्मादी झालेले दुःशासनादि कौरव स्वतःच्या सत्वशीलतेच्या व सत्यपरतेच्या जोरावर सान्या संकटांचा स्वीकार करणारा धर्मराज व इतर पांडव, आणि त्यांच्यामागें असणारें कृष्णाचें अलौकिक साहाय्य, इ. सर्व गोष्टींमुळें द्यूतसभा आपणांस काव्यदृष्टचा व घटनादृष्टचा सरस वाटावी ह्यांत नवल नाहीं.

## (२) मुक्तेश्वरकृत द्यूतसभावर्णन–(रसग्रहण)

कवींना वा नाटककारांना स्फूर्तिप्रद वाटणारा हा प्रसंग सभापर्वांत आला आहे. सभापर्वांतिला सर्वच दृष्टीनें हा अत्युच्च बिंदू आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. मुक्तेश्वरानें आपले दोन अध्याय या प्रसंगांस दिलेले आहेत. पहिल्यांत वीस डावांचें वर्णन असून द्रौपदी पणास लावली जाईपर्यंतचा भाग आहे. दुसऱ्यांत प्रत्यक्ष द्रौपदीवस्त्रहरणाचा करुण व अद्‌भुतरम्य

प्रसंग आहे. मुक्तेश्वरास महाभारताचें बंधन येथे आहे. म्हणजे केवळ याच प्रसंगावर स्वतंत्र काव्य करावयाचें असतें तर त्याच्या ठायींच्या कवित्व-शक्तीचें अधिक सुस्पष्टपणे दर्शन झालें असतें.

आधुनिक काव्य निकषावर हा प्रसंग घासून पाहिला तरीहि त्याचे पैलू ठसठशीतपणे दिसूं लागतात. रचनादृष्टया व घटनादृष्टया त्यांत एक प्रकारची कलात्मक सुसूत्रता व परिणामकारकता आहे याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. ह्या विचाराचें विस्तारानेंहि विवेचन करतां येणे शक्य आहे. उदाहरणार्थ शकुनीनें राजे लोकांनीं "गजयुद्धे महिषायुद्धे, मेषकुक्कुट बकयुद्धे। दृष्टी पाहावीं मल्लयोद्धे। कौतुकें काळ कंठावा" असा सल्ला दिला. पण त्यापेक्षां द्यूताचें थोरपण कसें व्यक्त केलें तें पाहाण्याजोगे आहे. "द्यूतें नासे आळस। चढता वाढे सुख हव्यास। परी पैंजेविण आवेशास सहसा जाण उपजेना।" अशा तऱ्हेनें पैज लावून खेळण्याची पार्श्वभूमि करून ठेविली. त्यानंतर विदुरानें काढलेला आक्षेप, त्याला धृतराष्ट्रानें दिलेली बाह्यात्कारी संमति व शेवटीं दुर्योधनशकुनींचा विजय, त्यांनीं केलेलें विदुराचें ताडण, हा सर्वच भाग पार्श्वभूमीचा भाग म्हणून चांगला साधला आहे.

त्यानंतर वीस डावांपर्यंत धर्मराजानें जे अमितद्रव्य हरविलें, त्याचें वर्णन कवीनें केलें आहे तें पण तपासण्यासारखे आहे. विशिष्ट गोष्टी पणास लावतांना कवीनें त्या गोष्टीचें जे महत्त्व वर्णिले तें समर्पक वाटतें––त्यांत पाल्हाळ वाटत नाहीं हें विशेष होय. विशेषत: चार भाऊ व द्रौपदी यांना पणास लावण्यापूर्वी केलेलें त्यांच्या पराक्रमाचें वर्णन त्रोटक पण परिणामकारक झालें आहे. घटनेच्या दृष्टीनेंहि एकांतून दुसरी घटना, दुसरींतून तिसरी ह्याप्रमाणे या घटना साखळीच्या दुव्याप्रमाणे निबद्ध वाटतात.

या घटनांच्या जुळणीमध्यें आणखी एक प्रकारची मनोज्ञता भरलेली आहे व ती म्हणजे, एकींतून दुसरी घटना निघण्याचीं कारणे आहेत तीं पूर्णपणें मानसिक आहेत. पांडवांनीं कौरवांचा प्रत्यक्ष पराभव वा अपमान कांहींच केलेला नसतो, तरीहि दुर्योधन त्यांच्या वैभवानें जळफळतो व अस्वस्थ होतो, मयसभा पाहतां पाहतां द्रौपदी सहजगत्या दुर्योधन दुश्शासनांच्या फसगती-बद्दल हंसते; दुर्योधनाच्या ईर्षामंथर मनाला ह्या अपमानाचा सूड घेण्याची इच्छा होते, तो तसा प्रयत्न करतो; तो सफल होत नाहीं. पण तिच्यांतच पुढील

घटनांचीं बीजें असतात. हा सर्वच भाग अंतःसृष्टींतल्या या आंदोलनाच्या दृष्टीनें महत्त्वाचा वा अविस्मरणीय वाटतो.

आधुनिक रसग्रहणाचें तिसरें लक्षण म्हणजे व्यक्तिस्वभाव व त्यांचा संघर्ष. या दृष्टीनें या घटनेचें विवेचन वर आलेंच आहे. मानवी स्वभावांतील एकेक विशेष घेऊन त्याला व्यक्तिरूप करण्याची पद्धति भारतकारांनीं स्वीकारली, व तीच दीर्घकालपर्यंत रसोत्कर्षी ठरली आहे. हें स्वभावलेखन आपल्या काळचें नव्हे हें ध्यानांत घ्यावयास हवे; म्हणजे हीं पात्रें जिवंत वाटतात खरीं, पण त्यांत व्यक्तिधर्मसहजता कमी आहे.

सत्यनिष्ठा धर्मराजांत व्यक्तीभूत झाली, ईर्षेनें दुर्योधनाचा अवतार घेतला, दुष्टतेनें दुःशासनादि कौरव भूषविले, अविचारी उत्साह भीम बनला, संकुचित पुत्रप्रीतीनें आलेली कर्तव्यच्युति धृतराष्ट्रांत संचरली, अविचाराकडे, अधःपाताकडे जात असतांहि विचारशीलता जागृत असते तिचा व अविचारशीलतेचा संग्राम होतो व शेवटीं दुसरीच यशस्वी होते ही वस्तुस्थिति विदुर व शकुनी यांच्या द्वारें दाखविली आहे आणि या सर्व मनोभावांवर विजय मिळविणारी अशी एक शक्ति जगांत असते, तिचीच अधिसत्ता जगावर चालते, तीच नियति; व ह्या शक्तीचें प्रतीक म्हणजे श्रीकृष्ण आणि त्याच्या लीला!

सभापर्वांत व ह्या प्रसंगांत वरील व्यक्तींचें वर्तन होतें तें ह्या संकेतानुसार. आपल्या कालीं हीं सर्व चित्रें आकर्षक वाटतात. त्या दृष्टीनें मुक्तेश्वरी भारत वा सभापर्व आजहि मोलाचें वाटतें पण त्यांच्या निष्ठा वेगळ्या होत्या. हीं स्वभावचित्रें म्हणजे स्वयंपूर्ण व्यक्ति नव्हत हें ध्यानांत घ्यावयास हवें. वर दिलेले संकेत हे भारतकारांनींच दिले आणि मुक्तेश्वरानें ते तंतोतंत पाळले आहेत.

तेव्हां रचनाकौशल्य, घटनांतील सुसूत्रता, मनोविकारीकृति. . .इ. सर्व दृष्टींनीं हा प्रसंग रसपूर्ण वाटतो तरी त्यांतला नाट्यपूर्ण असा वस्त्रहरणाचा जो भाग आहे त्याचें स्वरूप वेगळें आहे. ह्या दृष्टीनेंच त्याचें परिशीलन स्वतंत्रपणे करावयास हवें.

## (३) द्रौपदीवस्त्रहरण

कौरवांनीं तयार करविलेली द्यूतसभा मयसभेपेक्षां कशी भिन्न

आहे व घटनाप्रधान आहे हें आतांपर्यंत पाहिलें. द्यूत सभेमधील सर्वांत महत्त्वाची घटना म्हणजे द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रयत्न ही होय. महाभारतांमधील सर्वांत जास्त खळबळजनक अशी ही घटना आहे. अनेक कवींच्या काव्याचा विषय ही घटना बनली आहे. अशा या प्रसंगाचे वर्णन करतांना मुक्तेश्वराच्या प्रतिभेला विलक्षण तेज चढलेलें आहे. द्रौपदीला सभेमध्यें आणण्यापासून श्रीकृष्णानें तिची संकटापासून मुक्तता करीपर्यंत कवीनें रसोत्कर्षाची कमान चढती ठेवली आहे. कोठेंहि शिथिलता प्राप्त झालेली नाहीं. रजस्वला व एकवस्त्रा अशा द्रौपदीला सभेमध्यें ओढून आणण्यासाठीं दुःशासन गेला असतां तिची झालेली भीतिग्रस्त मनःस्थिति, तिची ती स्थिति पाहून विश्वामध्यें सर्वत्र झालेला हाहाकार, सभेमध्यें आल्यावर तिनें सर्व गुरुजनाशीं केलेला युक्तिवाद, भीमसेनाकडे क्रोधदृष्टीनें टाकलेले नेत्रकटाक्ष, युक्तिवाद विफल झाल्यावर केलेली करुणेची याचना, श्रीकृष्णाचा तिनें केलेला धावा—इ. विविध भावनाविष्कारी प्रसंग मुक्तेश्वरानें अत्यंत तन्मयतेनें रंगविले आहेत

दुःशासनानें द्रौपदीला, 'सभेला नेल्यावीण सर्वथा। मी तत्त्वतां न सोडी।।' असें सांगितल्यामुळे तीं राणीवशामध्यें पळत चालली; पण तिचा पाठलाग करून दुःशासनानें तिला पकडली. "हात घालूनियां कुरळीं। आंसडूनि पाडिली पायांतळीं। जैसी उलथे कर्पूर कर्दळी। मत्त करीनें ताडितां।।" द्रौपदीनें मदतीसाठीं हांका मारतांच सर्वत्र प्रलयकाळचा आकांत झाला; सर्व पृथ्वी कंपायमान झाली; तिला कांपरें भरलें; सूर्य, चंद्र-तारासहित कोंसळून पडतो आहे असें वाटलें. कैलास डळमळला, वैकुंठीचा कळस ढळला कीं काय असें वाटूं लागलें; देवांगना दुःखी झाल्या; उमा, रमा, रेणुका, लोपामुद्रा, अरुंधती या साध्वी स्त्रिया कौरवांना शाप देऊं लागल्या, "शंकर नयनींचा प्रळयाग्नी। उसळोनि स्रवों पाहे धरणी। कौरव कुळाचिया काननीं। बीज निर्मूळ करावया।।" अशा तऱ्हेनें सर्वत्र आकांत चालूं असतां व्याघ्रानें जशी एखादी गाय धरून आणावी त्याप्रमाणें दुःशासनानें तिला धरून सभेमध्यें आणिली. तिची ती दारुण अवस्था पाहून सर्व चर अचर सृष्टि शोकाकुल झाली. 'संत महंत परम दुःखें। नेत्र कमळें झांकिती।। खेद पक्षियां तरुवरां। बैसका भंगिल्या गिरिवरां।

रक्तोदकाच्या सागरा । लोट आला अद्‌भुत ।। ' सभेमध्यें द्रौपदीला पाहून दुर्योधन कर्णादि दुष्टांना अतिशय आनंद झाला व ते निर्लज्जपणे तिला वाटेल तें बोलूं लागले. त्यांची ती पापवाणी ऐकून द्रौपदी संतप्त होऊन भीमाकडे बघूं लागली, त्याबरोबर त्याचा हृदयस्फोटच झाला. दांत ओठ खात, गदेला हात घालून तो एकदम उसळून गदायुद्धाला सज्ज झाला. पण धर्मराजानें त्यास आवरून धरिलें. हरिश्चंद्र, शिबी, श्रियाळ यांचीं उदाहरणें देऊन त्यानें सत्त्वपालनाचें महत्त्व त्यास समजाऊन दिलें. अगदीं थोडक्या शब्दांत मनोविकारांचें सुस्पष्ट दर्शन घडवून आणून प्रसंग डोळ्यापुढें उभे करण्याचें मुक्तेश्वराचें सामर्थ्य या ठिकाणीं चांगलेंच प्रत्ययास येतें. धर्माच्या उपदेशानंतरहि भीमास क्रोध आवरत नाहीं. " नावेक क्रोधसिंधूचा लोट । न धरवे आवेश उद्‌घट । म्हणे सहदेवा हव्यवाट । प्रदीप्त करी ये काळीं ।। छेदून धर्माचे द्वय हस्त । भस्म करीन अग्नि आंत । " अशा प्रकारें भीमाचे ठिकाणीं मूर्तिमान क्रोधाचा संचार झाला असतां अर्जुनानें त्याची समजूत घातली.

आतां आपले पति देखील आपल्या मदतीला येऊं शकत नाहींत हें पाहून द्रौपदीनें सभेंतील गुरुजनांशीं युक्तिवाद करून पाहिला. "देव, ब्राह्मण, वेद, अग्नि यांच्या साक्षीनें पिता आपली कन्या वराप्रत देतो त्याप्रमाणें हे भीष्म-द्रोणादि गुरुजनहो ! आपण मला दुर्योधनानें जिंकली आहे असें त्रिवार सांगा, मग पुढें व्हावयाचें तें खुशाल होऊं दे " असा बिनतोड पेचप्रसंग तिनें निर्माण करतांच भीष्म-द्रोणादि वृद्धांनीं अत्यंत निंद्य असें वर्तन केलें. हा प्रसंग महाभारतांत अत्यंत महत्त्वाचा आहे. मुक्तेश्वरानेंहि या नाटयपूर्ण प्रसंगाचें अत्यंत उत्कृष्ट असेंच वर्णन केलें आहे. भीष्मद्रोणांचें अन्यायी वर्तन पाहून विकर्ण नामक दुर्योधनाचा भाऊ उसळून उठला व गर्जून म्हणाला :

" धृतराष्ट्र सत्त्वें सांडवला । पुत्र मोहें भ्रमें भुलला । भीष्महो स्वधर्मा भ्रंशला । सत्य साचार न बोले ।। त्रिवाचा गर्जोनिया हांके । द्रौपदी जिंकिली हें लटिकें । जिंकिली म्हणतां पातकें । लिप्त होती निर्धारें ।।"
हें त्याचें न्यायपूर्ण भाषण ऐकून कर्ण त्याची निर्भत्सना करतो. दुर्योधन द्रौपदीला आपल्या मांडीवर येऊन बसण्यास पाचारण करतो. त्याबरोबर तिच्या हृदयांत क्रोधाग्नीचा भडका उडाला व एखाद्या चवताळलेल्या नागिणी-

प्रमाणें ती उसळून दुर्योधनाला प्रत्युत्तर देते. या तिच्या उत्तरामध्यें मुक्तेश्वराचा कल्पनाविलास दिसून येतो. भावनोत्कट प्रसंगाची धार कमी न करतां उलट ती अधिक तीव्र करणारीं रूपकें निर्माण करण्यांत मुक्तेश्वर कुशल दिसतो. या ठिकाणचें 'भीमाकरीं जे गदानोवरी...' हें रूपक असेंच प्रसंगानुकूल आहे.

युक्तिवादाचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं तेव्हां तिनें श्रीकृष्णाचा अत्यंत करुणरम्य असा धावा केला आहे. या ठिकाणीं कवीनें भक्ति, कारुण्य, वात्सल्य इत्यादि भावनांची अभिव्यक्ति अत्यंत उत्कटतेनें केली आहे. भावनांच्या उत्कटतेबरोबर रम्य कल्पनाविलासहि येथें आहेच. म्हणून काव्यदृष्टया हें प्रकरण हृद्य झालें आहे. या ठिकाणीं कवीनें श्रीकृष्णाच्या निवासस्थानाचें अतिरम्य असें वर्णन केलें आहे. निर्गुण अशा द्वारका नगरीमध्यें निर्विकल्प अशा वृक्षांच्या उद्यानामध्ये ध्यानरूपीं रत्नसदनांत समाधीच्या शेजेवर श्रीकृष्ण निद्रिस्त झालेला होता. हें श्रीकृष्णाचें सदन म्हणजे वैराग्यरूपी वसंताचें निवासस्थान असून तें आत्मस्वरूपाच्या चिन्मय प्रकाशानें देदीप्यमान् झालें होतें. असें हें सदन जणूं काय शिवाचें मनच होतें. अशा सदनामध्यें श्रीकृष्ण पहुडला असतां द्रौपदीनें सुरू केलेला धावा त्याच्या अंतःकरणाला येऊन भिडला. श्रीकृष्णाचा धावा वर्णन करीत असतां मिळणाऱ्या भक्ति सुखांत मुक्तेश्वराची वाणी रमून गेली आहे. द्रौपदीच्या हाकेनें कृष्णाला जागृति आली ही कल्पना अतिशय सुंदर काव्यमय अशा रूपकांत कवीनें व्यक्तविली आहे. "कीं ते सुशब्द राजहंसी । उड्डाण करूनि चिदाकाशीं । रिघोनि कृष्णाच्या मानशीं निद्रामृत डहुळलें ।। कीं द्रौपदी वाक् चापींचे बाण । करुणातेजें अति तीक्ष्ण । कृष्ण श्रवणीं रिघोनि पूर्ण । हृदयवर्णी खडतरले ।। " मुक्तेश्वरानें श्रीकृष्णाच्या निवासस्थानावर व एकंदरींत या कथाभागामध्यें केलेलीं वेदान्ती रूपकें एकनाथांच्या रुक्मिणी स्वयंवराची आठवण करून देतात.

द्यूतसभेमध्यें अवतरून श्रीकृष्णानें द्रौपदीची लाज राखिली ह्या प्रसंगाचेंहि अति रम्य असें वर्णन कवीनें केलें आहे. "कैवारियाच्या उभय करीं । पीतांबर टाकिला द्रौपदीवरी । वीज तळपे तयावरी । सभेवरी उजेड ।। तों सुगंध न संठे गगनोदरीं । आल्हादली द्रुपदकुमरी । म्हणे मज पावला मुरारी । आतां न भी कळिकाळा ।। " कृष्णानें द्रौपदीला जीं वस्त्रें नेसविलीं

त्यांचें वर्णन करतांना मुक्तेश्वरानें एतद्विषयक स्वतःच्या ज्ञानाचें प्रदर्शन केलें आहे. हा वस्त्रविषयक तपशील अस्थानीं वाटतो. कीर्तनांतील आवश्यकता व तत्कालीन अभिरुची यांचा हा परिणाम असावा.

द्यूतसभेतील हा वस्त्रहरणाचा प्रसंग काव्य या दृष्टीनें या पर्वांत उत्कृष्ट उतरला आहे यांत शंका नाहीं. विविध रसांचा परिपोष, मानवी विकारांचा संघर्ष, नीति अनीतिविषयक विचारांचा कल्लोळ, नाट्यपूर्ण संभाषणें, भाषेची गतिमानता यांचे दृष्टीनें हा प्रसंग व त्याचा परिपोष अत्यंत हृदयंगम झाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

## (४) राजसूय यज्ञसमारंभ व शिशुपालवध

द्यूतसभेच्या खालोखाल सभापर्वांतील अत्यंत महत्त्वाचा प्रसंग म्हणजे राजसूय यज्ञाचा व त्या वेळीं झालेल्या शिशुपाल वधाचा. मयसभा उत्सव संपतां संपतां नारद मुनींचे आगमन होतें. त्यांच्या, धर्मराजाला राजधर्माच्या परिपालनासंबंधीं निरनिराळ्या पृच्छा होतात. आणि शेवटीं धर्मराजाच्या सांगण्यावरून इतर लोकपाल सभांचें वर्णन येतें. त्यांतून पंडूचा निरोप धर्मराजास कळतो, त्यानुसार तो दिग्विजयास चारी दिशांस चार भावांस पाठवितो, आणि अश्व परत आल्यावर मयसभागृहांतच राजसूययज्ञ समारंभ होतो. त्या वेळीं कृष्णाला शिशुपालाचा वध करावा लागतो व तोच प्रसंग कवींच्या प्रतिभेला प्रेरणा देण्याला कारणीभूत झाला आहे.

या यज्ञसमारंभाच्या प्रसंगाचे एकंदर दोनतीन विभाग पडतात. अश्व घेऊन चारी दिशांस अर्जुन, भीम, नकुल, सहदेव हे जातात, त्या त्या दिशाभागीं वसत असलेल्या राजांकडून करभार (खंडणी) वसूल करतात, म्हणजे आपलें सार्वभौमत्व प्रस्थापित करतात येथपर्यंतचा पहिला भाग. ह्या भागांत मुक्तेश्वरानें आपलें सारें ज्ञान मांडलें आहे. कालविपर्यासाची तर तमाच नाहीं. अनेक मांडलिक राजांत उग्रमुखी इंग्रज, जाबी, जंगी फिरंगी, तसेंच बर्बर, यवन, किरात, शक, । पारसी भाषिक ताम्रमुख । आरब हुरमुज काळमुख । यांचाहि उल्लेख केला आहे. हे, व कोणते राजे कशा रीतीनें मांडलिक झाले हें वर्णन ठराविक साच्याचें वाटतें. आजच्या आपल्या अभिरुचीस मोह पाडील असा भाग त्यांत अल्प आहे.

राजसूययज्ञानिमित्त सोडलेला अश्व परत आल्यानंतर प्रत्यक्ष यज्ञ

झाला व त्यावेळीं झालेला व या ठिकाणीं कवीनें विस्तारानें वर्णिलेला प्रसंग म्हणजे यज्ञांतील भोजनविधि. आपणांस या प्रसंगांत तितकेसें 'काव्य' आहे असें वाटणार नाहीं. परंतु मुक्तेश्वराच्या काळच्या कल्पना पाहिल्या कीं, मुक्तेश्वरासारख्या ब्राह्मण कवीस भोजनप्रसंग प्रिय वाटणें साहजिक आहे. आणि म्हणून जर थोड्या सहानुभूतीनें पाहण्याचा यत्न केला तर कवींच्या ठायींची कवित्वशक्ति येथें दिसून येते अर्थात् त्या वेळचें कवित्वशक्तीचें मुख्य गमक म्हणजे वर्णनकौशल्य. भोजनप्रसंगीं व इतर यज्ञप्रसंगींची खातें-वाटणी कवीनें तपशीलवार केलेली दिसते. त्यांत दुर्योधनापासून तों द्रौपदी-कृष्णापर्यंत सर्वांना कांहीं कांहीं काम दिलें होतें. कृष्णाच्या वाट्यास भोजनानंतर उष्टीं काढण्याचें काम होतें व द्रौपदीनें ब्राह्मणांना वाढण्याचें काम घेतलें होतें.

या सर्व वर्णनांत अत्युक्ति व चमत्कृति असावी हें क्रमप्राप्त आहे. त्याप्रमाणें मुक्तेश्वरानें जो विनोद निर्माण केला आहे तो त्याचा विनोदाचा नमुना म्हणून पाहण्यासारखा आहे. वाढतां वाढतां द्रौपदीच्या कंचुकीचें बिरडें सुटतें व तिचे हात कामांत (वाढण्याच्या) गुंतले असल्यानें तिला तें बांधतां येत नाहीं. याप्रसंगीं कृष्णकृपेनें तिला दोन हात आले व वाढतां वाढतां त्यांनीं तिला गांठ मारण्याचें काम करतां आलें. विनोदाच्या दृष्टीनें हा प्रसंग कमी आकर्षक आहे. आपल्या अभिरुचीला त्यांत 'रस' दिसत नाहीं. त्याचप्रमाणें कौरवांनीं द्रौपदीची जी बीभत्स चेष्टा केली ती तर अत्यंत दोषास्पद आहे. मुक्तेश्वर या बीभत्सतेच्या दोषांतून मुक्त होऊं शकत नाहीं. निरनिराळे पंक्तिवीर निरनिराळे पदार्थ मागून द्रौपदीची फजिती करूं पाहात होते. पण याहि प्रसंगीं कृष्णकृपेनें प्रत्येक पात्रावर एकेक द्रौपदी निर्माण झाली व सर्व भोजनवीरांना "जो जो पदार्थ आवडे तोंडा। त्याचे पर्वत पाडिले पुढां।" असा चमत्कार घडला. यांतून मात्र चांगला विनोदाचा प्रसंग निर्माण झाला आहे. नानाप्रकारचे पदार्थ एकदम मागणाऱ्या कौरवांच्या पानांत भक्ष्य भोज्यांचे पर्वतप्राय ढीग पडूं लागले. तेथें भीम अवतरला व आपल्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें पानामध्यें अन्न न टाकण्याबद्दल बजावूं लागला : "भीम म्हणे सांडिता मूढां। शिखा उपडीन हस्तकें।" ह्या दोन्ही चमत्कार प्रसंगांतून आपल्या दृष्टीस एक गोष्ट दिसते व ती म्हणजे द्रौपदीच्या क्षुल्लक कार्यासहि कृष्ण त्वरेनें धांवून येतो. यांतून वस्त्रहरणाच्या प्रसंगीं होणाऱ्या चमत्कृति-

पूर्ण घटनेची सूचना दिली आहे असें म्हणतां येईल. भोजनाचे जे विविध पदार्थ आहेत ते मुक्तेश्वराच्या काळीं ब्राह्मणी भोजन कशा प्रकारचें होतें. याची साक्ष देतात.

या प्रकरणांतील सर्वांत महत्त्वाचा प्रसंग म्हणजे याच वेळीं झालेला शिशुपालवध हा होय. स्वतंत्र काव्यकृतीला योग्य असा हा प्रसंग आहे. त्यांत श्रीकृष्णाच्या शौर्यवर्णनापेक्षां त्याचें भक्तिभावानें गुणगान करावें हीच उर्मी दिसून येते. कारण सुदर्शन चक्रानें कृष्णानें शिशुपालाचा जो शिरच्छेद केला त्यांत त्याच्या शौर्यापेक्षां त्याच्या दैवीपणालाच प्राधान्य देण्यांत आलें आहे. या सर्व घटनेला पूर्वनियोजित विधिलिखिताचें आवरण चढविलेलें असल्यानें हें दैवीपण अधिकच भासतें. या कथेमधील श्रीकृष्ण गुणगान या विषयाला कवींच्या दृष्टीनें जेवढे महत्त्व आहे तेवढेंच किंबहुना थोडें अधिक असें महत्त्व या नाट्यपूर्ण प्रसंगीं उद्‌भवणाऱ्या मनोविकारांच्या चित्रणाला आहे. अनेक कवींची प्रतिभा या ठिकाणीं रमली आहे ती यासाठींच.

धर्मराजानें राजसूययज्ञप्रसंगीं अग्रपूजा कोणाची करावी हा प्रश्न विचारल्यावरून भीष्मानें श्रीकृष्णाचें नांव सुचविलें. पण शिशुपाल आदि मंडळींना तें मान्य झालें नाहीं. त्यानें कृष्ण व भीष्म या दोघांचीहि भरपूर निंदा करून सभेला स्तिमित करून सोडलें, आणि यज्ञमंडपांतच युद्धाला प्रारंभ होतो कीं काय अशी वेळ आणिली. भीम व सहदेव यांना तें न साहून ते शिशुपालाचा वध करण्यासाठीं उठले. पण भीष्मानें त्यांना सांवरून धरिलें व शिशुपालाचा वध कृष्णाच्या हातूनच व्हावयाचा आहे असें विधिलिखित सांगितलें. शेवटीं अपराधांची मर्यादा ओलांडून शिशुपाल पुढें चालला तेव्हां कृष्णानें सुदर्शन चक्रानें त्याचा शिरच्छेद केला.

अग्रपूजेसाठीं कृष्णाचें नांव पुढें येतांच कवीनें आपली परमात्म गुणगानाची हौस यथेच्छ भागवून घेतली आहे. भीष्म म्हणतो ' हा विश्वजनकाचा जनक आहे, यास हरादि देव वंदन करितात, इंद्राला इंद्रपद याचेमुळेच प्राप्त झालें आहे.' " त्रैलोक्य नगरारंभस्तंभु । विराट तरूचा कोमळ कोंभु । प्रणवशिखरींचा शंभु । ज्ञानदृष्टीं पहावया ।। " हा श्रीकृष्ण आदिमायेचा निर्माता आहे, निगमवल्लीचें सुपक्व फळ आहे. विविध दर्शनें ज्याचें परमेश्वर

म्हणून वर्णन करितात तो हाच आहे. मीमांसक जें कर्मकांड करितात तें याच परमात्म्याच्या प्राप्तीसाठीं सांख्यांचे प्रकृतिपुरुष म्हणजे श्रीकृष्ण रुक्मिणीच होत; आणि भाष्यकारांचा आत्मा म्हणजेहि हाच. पातंजलीय योगाचा (हटयोगाचा) प्रयत्न याच्याच प्राप्तीसाठीं चालू असतो; शैवांचा शंकर, वैष्णवांचा विष्णु, गाणपत्यांचा गणपति, सौरांचा सूर्य हे सर्व म्हणजे श्रीकृष्णच होय. तेव्हां अशा कृष्णाला सोडून अन्य कोणाची पूजा करणे योग्य होईल बरें ? असें भीष्म विचारतो. या ठिकाणीं मुक्तेश्वरांच्या वेदान्तज्ञानाचें आपणांस दर्शन होतें.

[१३व्या अध्यायांत ज्ञानेश्वरांनीं परमेश्वराचें ज्ञान प्राप्त करून घेण्याची धडपड करणाऱ्या मीमांसक, सांख्य, योगी पुरुष इत्यादिकांचा असाच उल्लेख केला आहे.]

भीष्माचा आग्रह पाहून कृष्ण पूजास्थानीं आरूढ झाला. सोमकांताच्या श्वेत चौरंगावर क्षीरोदक घालून त्यावर मेघ.श्यामास आसन दिलें होतें. कवीनें याचें वर्णन अत्यंत सुंदर अशा उपमेनें केलें आहे. "तळवटीं क्षीरोदक उत्तम । वरी शोभला मेघश्याम । जेवीं कैलासा द्यावया क्षेम । नीलजीमूत पातला ।।" पांच भावांनीं निरनिराळीं कामें अंगिकारिलीं होतीं. अशा थाटानें धर्मराजानें श्रीकृष्णाची पूजा आरंभिली. या ठिकाणीं मुक्तेश्वरानें कृष्णाचें सविस्तर वर्णन केलें आहे. तें बरेंचसें सांकेतिक आहे. रूढ संकेतानुसार कवीनें या ठिकाणीं उदात्त अलंकाराचा उपयोग करून त्यानें हें वर्णन केलें आहे. अर्थात् रूढ संकेताप्रमाणे या वर्णनांत एक दोष दिसतो. संस्कृत कवींनीं परमेश्वरस्वरूप पात्रांचें वर्णन करतांना तें आमस्तकपाद असावें (रामरक्षेंतील रामाचें वर्णन पहावें) आणि मानवांचे वा दानवांचें वर्णन आपादमस्तक असावें असा संकेत रूढ केला होता. या ठिकाणीं मुक्तेश्वरानें केलेलें कृष्णाचें आपादमस्तक वर्णन हा संकेत सोडून केलेलें आहे. धर्मराजानें केलेली श्रीकृष्णाची पूजा शिशुपाल, दुर्योधन आदि कृष्णद्वेष्टयांना सहन न होऊन ते संतापून उसळले. (येथें शैव वैष्णव वादाचा उल्लेख करून मुक्तेश्वरानें या कृष्णद्वेष्टयांबद्दलचे स्वतःचें मत दिलें आहे.) मोठमोठाले पूज्यवर ऋषि राजे यांना सोडून गवळ्याच्या पोराची पूजा केल्याबद्दल धर्माची, भीष्माची व कृष्णाची त्यानें भरपूर निर्भर्त्सना केली व मोठ्या क्रोधानें तो सभेंतून बाहेर

पडला : "ऐसे बोलोनि क्रोधदृष्टीं । हातीं वसवी खड्गमुष्टी । घेऊनि राजयांच्या थाटी । चैद्य तेथोनि निघाला ।।" धर्मराजानें अत्यंत सात्त्विक बुद्धीनें त्याला तसें न करण्याबद्दल विनवून पाहिलें. भीष्मानें धर्मराजाला शिशुपालाची समजूत घालण्यापासून परावृत्त करून पुन्हा कृष्णस्तवन केलें. सहदेवानें कृष्ण द्वेष्टयांना युद्धाचें आव्हान दिलें. शिशुपाल व त्याचे मित्र यांनींहि युद्धाची तयारी चालविली. पण युद्धापूर्वी शिशुपालानें पुन्हां कृष्ण-निंदा चालविली. त्याचीं शंभर पापें भरत आलीं. कृष्ण व भीष्म यांना वाटेल तसे तो टाकून बोलूं लागला. भीमाला क्रोध आवरेना. पण भीष्मानें शिशुपाल जन्माची कथा सांगून त्याच्या मृत्यूचें भविष्य कथन केलें. शिशुपाल कृष्णाला उद्देशून म्हणाला : "रुक्मिणी मातें संकल्पिली । तेव्हांचि मनीं म्यां भोगिली । पुनभुक्त तुज प्राप्त झाली । मुक्त माळेसारखी ।। भीमकी माझी अंतुरी । तुवां नेली करुनी चोरी । दशाननासारिखी ।।" ही त्याची बडबड ऐकून कृष्ण संतप्त झाला व सुदर्शन चक्र सोडून त्यानें शिशुपालाचा शिरच्छेद केला. "भानुतेजासारखा प्रबळ । चैतन्य तेजाचा कल्होळ । शत्रु मुखाहूनि तात्काळ । कृष्णमुखीं रिघाला ।। कारण "वैर अथवा भजन । समान देखे मधुसूदन । शिशुपाळ भक्त गहन । म्हणोनि हृदयी ठेविला ।।"

मुक्तेश्वरानें या प्रकरणाला दोन स्वतंत्र अध्याय दिले आहेत. कृष्ण-स्वरूपवर्णन, कृष्णगुणगान, या भक्तिपर विषयांना येथे वाव असल्यानें मुक्तेश्वराची वाणी येथे रंगून गेली आहे.' त्याशिवाय कलेच्या दृष्टीनेंहि नाटच-पूर्ण प्रसंग रंगविण्यास येथे भरपूर वाव आहे. शिशुपाल, भीष्म, सहदेव, भीम, धर्म यांच्या स्वभावाच्या छटा मोठया कौशल्यानें कवीनें रंगविल्या आहेत. प्रसंगवर्णन या दृष्टीनें हें प्रकरण अत्यंत रसपूर्ण असेंच वठलें आहे.

## (५) नारदनीति

श्रीकृष्णानें अनुज्ञापिल्याप्रमाणे मयासुरानें बिंदु सरोवरामधील अगणित संपत्ति आपल्या अनुयायांकडून आणवून पांडवांच्यासाठीं अप्रतीम अशी सभा बांधून दिली. धर्मराजानें आपल्या सर्व परिवारासह मयसभा अवलोकन केली व तिजप्रीत्यर्थ मोठा उत्सव साजरा केला. अशा या आनंदप्रसंगीं महर्षि नारदांची स्वारी तेथें उपस्थित झाली. या प्रसंगाचें अत्यंत रसाळ असें वर्णन मुक्तेश्वरानें केलें आहे. "ऐसा अद्भुत ऐश्वर्य नादु । भरिते नि

माजला सुखसिंधु । उत्साह झाला अनेक विधु । त्रैलोक्याचा ते ठाईं ।। यावरी चमत्कारू झाला । भाग्यासी भाग्योदय पावला । ऐश्वर्यातेंहि जोडला । ऐश्वर्यलाभ ज्यापरी ।। अमृत वनावरी माधवी । काशीक्षेत्रावरी जान्हवी । सौरस कमळे ते केशवीं । हा विशेष विशेषु ।। " धर्मराजानें त्या ऋषिवर्याला कनकासनीं बसवून यथोचित सत्कार केला. नारदानें पूजाविधि झाल्यावर अनेक सूचक प्रश्न विचारून धर्मराजा राजधर्म कितपत पाळतो आहे हें पडताळून पाहिलें. याच प्रश्नांना 'क्वचित्' प्रश्न अगर नारद नीति असें नांव आहे. (मराठींत त्याचें रूपांतर 'किंचित प्रश्न' असें झालें आहे.) धर्मराजाला 'तूं धर्मानें राज्य करतो आहेस ना? धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांचें परिपालन योग्य तऱ्हेनें करतो आहेसना ? " यासारखे प्रश्न विचारून नारदानें राजनीतीचें अत्यंत मार्मिक विवेचन केलें आहे. म्हणूनच मुक्तेश्वर म्हणतो "कश्चित प्रश्नाच्या व्यंगोक्ती । उपदेश गर्भित राजनीती । पडताळिली धर्मातें ।। " प्रश्नांचें स्वरूप जरी धर्मराजा तूं अमूक अमूक गोष्टी करतोसना ? असें माहिती विचारण्याचें असलें तरी त्यामध्यें राजानें अमूक अमूक गोष्टी कराव्यात व अमुक अमूक गोष्टी करूं नयेत अशी सूचना आहे. राजानें विहीत कर्म भंग करूं नये. धर्माला अविरोध इतका कामोपभोग घेण्यास शास्त्रांचा विरोध नाहीं, पण त्यानें इंद्रियलोलुप होतां कामा नये. नित्य नैमित्तिक कर्मांमध्यें निष्काम मनोवृत्तीनें त्यानें वागलें पाहिजे, 'सकाम' (काम्य) व निषिद्ध कर्मांची उर्मि जशी आली तरी त्यानें तिचा मोह टाळला पाहिजे. दैव (अदृष्ट) अनुकूल असो वा प्रतिकूल असो धर्मापासून बुद्धि विचलित होऊं देऊं नये, आपल्या हातून रोज पापपुण्याचें किती आचरण होतें आहे याचा त्यानें अंदाज घ्यावा; मोक्षप्राप्ती करून देणारे मोक्षाचे द्वारपाल असे शम, संतोष, सद्विवेक व साधुसंग हे चार गुण, ते त्यानें अंगीं बाणवावेत; कामक्रोधादि षड्विकारांचें योग्य त्या ठिकाणीं वर्जन व योग्य त्या ठिकाणीं नियमन करूनच त्यानें आपलें आचरण केलें पाहिजे; परस्त्रीचा काम, सत्पुरुषाचा क्रोध, देहाचा लोभ, पुत्राचा मोह, सुहृद जातीमद, सर्वांभूतीं मत्सर हे विनाशाप्रत नेणारे आहेत. पण हेच षड्विकार अन्य ठिकाणीं कसे उपयुक्त आहेत हें मोठ्या कौशल्यानें सांगितलें आहे. ईश्वरभजनीं काम, इंद्रियदमनीं क्रोध तीर्थप्रसादशेषग्रहणीं लोभ, सज्जनाशीं मोह, दुर्जनासीं मद, संसारासीं मत्सर

हे कल्याणप्रद होतात. वक्तृत्व, शत्रुदमनीं उत्साह, उत्तम स्मरणशक्ति, तर्ककुशलता, दूरदर्शित्व, नीतिशास्त्रज्ञता हे षड्विध गुण; साम, दाम, दंड, भेद, मंत्र, औषध, इंद्रजाल हे सप्त उपाय व स्वपर बलाबल तोलण्याचे देश, दुर्ग, रथ, हत्ती, घोडे, योद्धे, अधिकारी, अंतःपुर, अन्नगणना, अश्वरथादिकांचा पुरवठा, नीति, जमाखर्चाचा हिशेब, द्रव्याचा पुरवठा, गुप्त शत्रु हे चौदा प्रकार या सर्वांचें राजाला ज्ञान असावें. राजाचे प्रधान, आज्ञा, कीर्ति ब्राह्मणपालन, दानशीलता, उपभोग व मित्र संरक्षण या सहा गुणांनीं अलंकृत असावेत. त्याचे सेनापति व्यूहरचना जाणणारे असावेत, निर्लोभी, विश्वासू व स्वामीकार्यासाठीं देहार्पण करण्याची तयारी ठेवणारे सेवक राजाजवळ असावेत; योग्य वेतनावर योगक्षेम चालवून राजद्रव्य न घेणारे असे अधिकारी असावेत; अधिकाऱ्यांच्या नेमणुका योग्यायोग्य विचार करूनच कराव्यात; नाहींतर अमात्य पदीं दासीपुत्र। अधमस्थळीं परमपवित्र। अपूज्या पुजोनि सत्पात्र। अवमानीत नाहींस कीं॥" असें व्हावयाचें. स्वामीकार्यांत मरण पावलेल्या कुटुंबियांना योग्य वेतन देऊन राजानें त्यांचें पालन पोषण करावें; दरिद्री बालमित्रांची विचारपूस करावी; दुसऱ्याच्या दुःखानें त्याचें मन कळवळून जावें; राजाच्या ठरलेल्या भागापेक्षां प्रजेकडून अधिक कर घेऊन जनतेला त्रास देऊं नये; प्रजेला चोर लुटारूंच्या कचाट्यांतून राजानें मुक्त करावें; आपल्या अडचणी सांगावयास येणाऱ्या दुर्बलांना भेटीची मोकळीक असावी; प्रजेच्या दुःखानें त्याचें अंतःकरण पीडित व्हावें; मागें आपलें व शत्रूचें बळाबळ तपासून पाहण्याची चौदा साधनें सांगितलीं आहेतच. येथें अन्य ग्रंथकारांनीं दिलेले बलाबलाचे भेद दिले आहेत (१) अंगबळ, (२) सेनाबळ, (३) कोशबळ, (४) दुर्गबळ, (५) शस्त्रबळ, (६) मंत्रबळ, (७) प्रधानबळ, (८) हृदबळ, (९, १०, ११) वेदत्रय बळ--आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, (१२) बुद्धिबळ, (१३) ब्राह्मणशेष सुकृत बळ, (१४) अन्य राजांचें बळ. या चौदाबलांची तपासणी करून राजानें आपलें व शत्रूचें बलाबल कशांत आहे हें नीट पाहावें; संधिविग्रह, यान, आसन, द्वैधीभाव, आश्रय हे सहा राजगुण, साम, दाम, दंड, भेद, इंद्रजाळ, मंत्र व औषध हे सप्त उपाय व वर वर्णन केलेले आपपरबलाबल पाहण्याचे चौदा भेद हे राजाला उपकारक असतात. राजानें शत्रूचा मित्र व मित्राचा शत्रु

यांच्याशिवाय मंत्री पुरोहितादि अठरा शत्रुपक्षीय, व यांतील राजपुत्र, कलत्र व सुहृद यांना वगळून उरलेले पंधरा स्वपक्षीय या सर्वांचा विकल्प मानावा. (अर्थ व स्पष्टी करणें विभाग पाहा).

राजाचे ऋत्विज श्रुतिपारंग असावेत, ते वाजपेय पुंडरीक इ. यज्ञ यथासांग पार पाडणारे असावेत. राजाचे भांडारी निरपेक्ष असावेत; अंतःपुराचें रक्षक (कंचुकी) क्लीब असावेत; पाककर्ते पवित्र व तृप्त असावेत. सरहद्दीवरील योद्धे निर्भय असावेत; किल्लेदार स्थिरबुद्धीचे असावेत; वाक्चातुर्यानें स्वामिकार्य साधणारे पंडित इष्ट साधनार्थ योजावेत, जितेंद्रिय साधुसंत नेहमीं संगतीला असावेत; सज्जनांचा छळ करणाऱ्यांचा जिव्हाच्छेद करावा, रात्रीं अपरात्रीं उठून पारमार्थिक गोष्टींचें त्यानें चिंतन करावें; वरचेवर किल्ल्यांची डागडुजी करावी; प्रजेच्या शेतीचें रक्षण करावें, रस्ते व्यवस्थित ठेवून व्यवहार सुकर करावा; राजानें देवालयांचा जीर्णोद्धार करून नैवेद्य नंदादीपादि नित्य गोष्टींकडे लक्ष द्यावें. राजानें भलत्या वेळीं भलत्याच गोष्टी करूं नयेत. सहस्रमूर्खांचा त्याग करून ज्ञानसंपन्न पंडितांचा अंगिकार करावा; राजानें आढ्य, व्यसनी, अनुरक्त, मित्र, उदासीन, शत्रु आणि अमात्य या सात प्रकारच्या माणसांची बुद्धि नीट ओळखून असावें, रहस्यभेद होऊं न देण्याची त्यानें काळजी घ्यावी. कांहीं गोष्टी उघड बोलावयाच्या असतात, कांहीं फक्त मुत्सद्यांच्या कानांतच सांगावयाच्या असतात व कांहीं मनांतच ठेवावयाच्या असतात. याबद्दलचा सारासारविवेक राजाजवळ असावा; परस्परांची ओळख नसणारे हेर नेमावेत; शिपायांचें वेतन नियमित द्यावें; खजिना रिता न होईल असा खर्च करावा, ( १/४ च राजानें खर्च करावा) खेडेगांवचीं शहरें करून व्यापारवृद्धि करावी; शेतकऱ्यांना योग्य ती मदत करून शेती समृद्ध ठेवावी; चोर, अधिकारी, राजस्त्रिया जनतेला पीडा देतात, तेव्हां राजानें त्यांच्यावर विशेष लक्ष ठेवावें; अष्ट भोगामध्ये राजानें रममाण होऊन जाऊं नये; आदानविसर्गादि अष्ट राजकर्तव्यांचे त्यानें परिपालन करावें. अष्टांग चतुर्विध दळांनीं शत्रूला जिंकावें; गुरु, देव, प्रतिमा इत्यादींना वंदन करावें; अंध, मुके, पंगु यांचें पालन पोषण करावें. नास्तिक्य, अनृत, संक्रोधता, प्रमाद, दीर्घसूत्रता, आळस, क्षिप्रवत्ता, निश्चिताचा नारंभ, ज्ञान्याचें अदर्शन, आज्ञानाचें दृढचिंतन, अनर्थी एकनिष्ठता, मंत्राचें अरक्षण,

मंगळाचा अप्रयोग, विषयाचा अतिप्रयोग या चौदा दोषांनीं राजानें आपलें शरीर व मन विटाळूं देऊं नये. राजानें आपल्या राज्यांत ढोंगी बुवांना स्वैराचाराला वाव देऊं नये, प्रजेच्या अनाचाराला संधि देऊं नये; राजानें प्रजेच्या कौटुंबिक गोष्टींतहि लक्ष घालावें. अशा प्रकारें राजनीतीपासून प्रजेच्या कौटुंबिक गोष्टीपर्यंत लक्ष देणारा राजा इंद्रलोकाप्रत जातो.

## सभापर्वांतील महत्त्वाची स्वभावचित्रें

### प्रास्ताविक

महाभारतांत निरनिराळ्या प्रवृत्तींचीं खूपच व्यक्तिचित्रें आलेलीं आहेत. या व्यक्तीचित्रांच्या द्वारें महाभारतकारांनीं आपणांस अभिप्रेत असलेला सत्यासत्यतेविषयींचा झगडा व्यक्त केला आहे. भारतांतल्या मध्यवर्ति घटनेला हें जें नैतिक व तदनुषंगानें सामाजिक महत्त्व आहे त्या दृष्टीनेंच पात्रपरिपोषाचाहि विचार करणें जरूर आहे.

प्रथम हें ध्यानांत धरणें आवश्यक आहे कीं आपल्याला आज अभिप्रेत असणारें स्वभावधारण हे नव्हे. म्हणजे या ठिकाणीं ज्या व्यक्ति आहेत, त्यांच्या ठायीं निरनिराळे गुणदोष आहेत, व त्या गुणदोषानुरूप निरनिराळ्या घटनाहि येथें घडलेल्या आहेत. परंतु या व्यक्ति ह्या आपल्या काळच्या नव्हत. या व्यक्ति व त्यांचें चित्रणहि कालसापेक्ष आहे. आपण मानवी मन म्हणून कांहीं वेगळें कल्पितों, व मानवी स्वभाव हा गुणदोषांनीं युक्त आहे अशी आपली श्रद्धा असते. त्याच प्रमाणें व्यक्तिमत्व म्हणून कांहींतरी आहे असा आपला दृढ विश्वास आहे. या ठिकाणीं मात्र तसें नाहीं. व्यक्तीच्या हातून निरनिराळ्या कृति घडतात पण त्यास त्या जबाबदार नाहींत असा एक खोल संकेत महाभारतांत अध्याहृत घेतलेला दिसतो; व तो व्यक्ति चित्रणावर आघात करणारा असा आहे. शिशुपालाचे उन्मत्त प्रलाप ऐकून सहदेवास चीड येते व त्याचा प्रतिकार करण्याचे दृष्टीनें त्याच्या हालचाली चालू असतात. परंतु तें काम कृष्णाच्या हातून घडावयाचें असल्यानें सहदेवाला हात चोळीत स्वस्थ बसावें लागतें.

मागें एका ठिकाणीं उल्लेखिल्याप्रमाणें हीं स्वभावचित्रें प्रामुख्यानें प्रतीकात्मक आहेत हाहि पण विचार स्वीकृत करावयास हवा. मानवी-

मनाचें त्यावेळेपर्यंत जें ज्ञान होतें, त्याच्या आधारानें मानवी मनाचे जे निर-निराळे गुणदोष ज्ञात झाले होते त्यांचें प्रतीकात्मक दिग्दर्शन येथें आढळतें. कांहीं किंबहुना सर्वच स्वभावचित्रें ह्या प्रतीकात्मक स्वरूपामुळेंच अत्यंत आकर्षक झालीं आहेत. धर्मराजाची सात्त्विक वृत्ति, भीमाचा अविचारी उत्साह, धृतराष्ट्राच्या कर्तव्यच्युतीस आधार असलेली पुत्रप्रेमान्धता, भीष्माची असहायता इ. वैशिष्टयें आजहि अत्यंत मनोज्ञ वाटतात.

त्याशिवाय सर्व स्वभावचित्रांच्या गुंफणींतून मानवी मनाला व प्रज्ञेला कुंठित करणारा असा जो सत्यासत्यतेचा झगडा आहे तो फारच भव्य आहे. कितीहि काल गेला तरी पात्रांचे हे स्वभावविशेष आपणांकडून विसरले जात नाहींत. जों जों बारकाईनें पाहावें तों तों महाभारतकारांच्या भव्य प्रतिभेची व विशाळ मानवी सहानुभतीची साक्ष पटते. मुक्तेश्वराचीं स्वभावचित्रें भारतकारांचीच प्रतिकृति आहेत पण ती रंगविण्यांत मुक्तेश्वराचें व्यक्तित्व व वैशिष्टय दिसून येतें, व त्या दृष्टीनें कांहीं स्वभावचित्रांचें येथें परिशीलन करूं.

## धर्मराज

श्रीकृष्णाच्या कर्तृत्वाची जर दैवी बाजू सोडून दिली तर महाभारतांत धर्मराजाइतकें आकर्षक पात्र नाहीं. त्या दृष्टीनें महाभारतात्रें नायकपद धर्मराजालाच देणें युक्त होईल. धर्मराजाचें नांवच असें सूचक आहे. तो धर्मानें वागणारा, नीतीच्या, सत्याच्या बाजूचा आदर्श असा राजा आहे. सत्य-धर्म, न्याय, नीति यांच्या परिपालनासाठीं वाटेल तो त्याग तो करता व ही त्याची सत्वशीलताच अत्यंत नेत्रदीपक ठरली आहे.

त्याच्या ह्या स्वभावाचे विशेष सभापर्वांत वैशिष्टयानें दिसून येतात. तत्कालीन नीति धर्माचें तो परिपालन अत्यंत कसोशीनें करतो. नारदाचें आगमन मयसभा प्रसंगीं होते त्या वेळीं धर्मराजानें त्यांचे पाय भालतिलकें स्पर्शिलें. त्यांत त्याची लीनता दिसून येते. धर्मराज आदर्श राजाच असल्यानें नारदानें विचारलेल्या कर्तव्यात्मक प्रश्नावलीनें त्याचें मन बिलकुल गांगरून जात नाहीं व यांतूनच भारतकारांनीं तो आदर्श राजा होता असें सूचित केलें आहे. नारदाचें भाषण ऐकून त्याचे तोंडून फक्त "केवढा विचक्षण होय. सर्वज्ञ देवऋषी" असें उद्गार बाहेर पडतात.

पुढे नारदानें लोकपाल सभांचें वर्णन करतांना, हरिश्चंद्रास इंद्रसभा लाभली व पंडुराजास मात्र यमसभा लाभली असें सांगितलें. हें ऐकून धर्मराज कुंठित होतो व असें कां? असा प्रश्न विचारतो; व नारदाकडून पित्याचा निरोप कळतांच तो व्याकूळ होतो व त्याच्या दृष्टीपुढे सुपुत्राचीं कर्तव्ये दिसूं लागतात, कुपुत्राचीं अवलक्षणे पण त्याच्या लक्षांत येतात; आणि शेवटीं ' 'पितृवचनालागीं जाणें। करीन राज्याचें सांडणें। प्राणातेंहि जिणें मरणे। कार्यसिद्धि असिद्धी।" असे निर्वाणीचे उद्‌गार बाहेर पडतात.

पितृभक्ति हा प्राचीन भारतीय संस्कृतीचा एक विशेष आहे. धर्मराजाच्या धर्मनिष्ठ मनाला पितृसेवेंत कांहीं उणीव राहिली काय अशी शंका निर्माण व्हावी हें साहजिक आहे व पित्याच्या केवळ स्वर्गप्राप्तीसाठीं राजसूय यज्ञाचा निश्चय तो पार पाडतो. (प्राचीन भारतीय सांस्कृतिक सामाजिक विचारांत हें पितृसत्तेचें स्थान अत्यंत महत्त्वाचें आहे. कारण स्वतःच्या पित्याच्या स्वर्गारोहणासाठीं ज्याप्रमाणें त्याला दिग्विजय करावा लागतो त्याचप्रमाणें आपल्या बंधूवर व पत्नीवर त्यांना विकण्याइतकी सत्ताहि त्याला लाभते. एका दृष्टीनें केवळ या एका विचाराच्या व संकेताच्या आधारावरच पुष्कळ घटना संभवतात.)

परंतु आपल्या प्रत्येक गोष्टींत, कृतींत श्रीकृष्णाचा सल्ला घ्यावा अशी त्याची तीव्र मनीषा असते व त्याप्रमाणे कृष्णाला तो म्हणतो "यथार्थ ऐकें पुरुषोत्तमा!। न करितां पितृवचन नेमा। धर्म तो मी अधर्मनामा। लोकत्रयी स्फुरेल ।। व मग कृष्णानें, "जरासंध अतिदारुण। जिवंत असतां तुमचा यज्ञ। सिद्धी न पावे सर्वथा" असा सल्ला दिला. या ठिकाणीं धर्माची पितृवासनापूर्तीसाठीं होणारी तळमळ व श्रीकृष्णाच्या ठिकाणचा निश्चय हे विशेष दिसून येतात.

धर्माच्या सात्त्विकतेची कसोटी, शिशुपाल वधाच्या प्रसंगीं दिसून येते. भीष्मांच्या सांगण्यावरून तो कृष्णाची अग्रपूजा करावयास सिद्ध होतो, परंतु शिशुपालाच्या विरोधानें त्याला आतां या समारंभांतून विघ्न निर्माण होतें कीं काय अशी भीति वाटते व म्हणून तो शिशुपालाजवळ जाऊन त्याची समजूत काढतो "तूं बंधूचियें पंक्तीं। सुहृद होसी आम्हांतें ।। आम्ही युक्तायुक्त केलें। तें तुवा पाहिजे प्रतिष्ठिलें। स्नेहभावें सांभाळिलें। तेंचि नेई शेवटीं।।" परंतु शिशुपाल इतका साधा नव्हे, व म्हणून त्याचे हे प्रयत्न वायां जातात.

तथापि खरा धर्मराज त्याची, सत्यनिष्ठा व सत्वशीलता द्यूतप्रसंगीं व त्यानंतरच्या प्रसंगीं दिसून येते. व्यासांच्या व नारदांच्या तोंडून त्याला पुढें काय काय होणार आहे याची पूर्ण कल्पना असते. परंतु सत्वशीलतेच्या जोरावर आपणांस सर्व संकटांपार होतां येईल असा त्याचा दृढ विश्वास असतो. द्यूतांत हरण्याचा बेत करून दुर्योधनाचे दूत येतात त्या वेळीं त्याच्या मनांत शंका आशंका निर्माण होतात. परंतु विदुराचें सांगणे ऐकायचें असें ठरवून तो रथांत बसतो. परंतु आयत्यावेळीं " भुली पडली सकळां । कोणीहि निषेध न करी खेळा ।" असें होऊन द्यूत सुरू झालें.

त्याला द्यूत चांगलाच येत असतो. त्याबरोबरच शकुनीचा कपटी डावही पण त्याच्या लक्षांत येतो. परंतु कपटावर सत्वशीलतेनें विजय मिळवायचा हें त्याचें ब्रीद. म्हणून भीमाच्या ओरडण्यानें वास्तविक शकुनीचा कपटीपणा बाहेर आणला जात असतांहि तो भीमास गप्प बसावयास सांगतो व वीस डावांत सर्वस्व हरतो. या ठिकाणीं धर्मराजाच्या ठायींच्या मानवी वृत्ति उचंबळून येतात. प्रत्येक डावांत आपण हरत आहोंत हें दिसत असतांहि त्याला ईर्षा आवरतां येत नाहीं व हें त्याचें मानवी प्रकृतिसहज अधःपतन त्याच्या उज्ज्वल सत्वशीलतेइतकेंच भव्य वाटतें.

त्याच्या मनांत बंधू व पत्नीबद्दल अतीव आदर असतो. -परंतु रूढ समाजरचनेप्रमाणे त्यांचें 'मालकीपण' त्याचेकडे आलें असल्यानें त्यांना त्यास पणास लावण्यासहि तो मागेपुढे पहात नाहीं. असें असलें तरी, आपले प्रिय बंधू पणास लावतांना त्याच्या तोंडून जो आदर व्यक्त झाला आहे तो वाचून त्याच्या बंधुप्रीतीचा अभिमान वाटतो.

परंतु त्याच्या सत्वशीलतेची अंतिम कसोटी द्रौपदीवस्त्रहरण प्रसंगीं लागते. द्रौपदीला विवस्त्र करण्याचा नीच प्रयत्न पाहून भीमाचा संताप अनावर होतो; परंतु याहीं वेळां तो निरनिराळ्या सत्वशील महात्म्यांचे दाखले देऊन शेवटीं विनवितो," क्रोध नावरे तुझिया चित्ता । तरी गदा वापी माझीये माथां । परि असत्यदोष कुंतीसुता । स्पर्शो ऐसे न करावें ।। सत्वशीलतेचा हा अत्युच्च बिंदू अतिमानवी आहे तरी तो विलोभनीय आहे हें खरें.

वनवासास जातांनासुद्धां धर्माचें वर्तन त्याला साजेसें आहे. भीम क्रोधानें उसळत वनवासास गेला, अर्जुन डाव्या उजव्या हातांनीं डोक्यांत माती घालीत

गेला, सहदेवानें आपलें मुख चिखलानें माखून घेतलें, तर नकुलानें सर्व अंगास मृत्तिका चर्चिली. परंतु धर्मराज--'वस्त्रें आच्छादून वदन । धर्मे केलें वन प्रयाण । न बोलतां कवणासी ।' अशा तऱ्हेनें सात्त्विकतेचा हा पुतळा मुख वस्त्रानें आच्छादून वनामध्ये गेला. या त्याच्या कृतीमध्यें फार मोठा अर्थ आहे. ही त्याची कृति त्याच्या स्वभावाला साजेशी अशीच आहे.

"आपुलें नयन हव्यवाटीं । भस्म होईल सर्व सृष्टि । म्हणोनि न पाहतां दृष्टीं । धर्म गेला जाणपां ।। अणीक एक कारण येथें । चौदा वर्षां कौरव प्रेते । पाहो न शके म्हणोनि हातें । दृष्टी झांके दयाळु ।।" धर्मराजानें मुख आच्छादन करण्याचीं हीं कारणें त्याच्या उदात्त चारित्र्याचें सौंदर्य वाढविणारीं अशींच आहेत. पुढें होणारा अनर्थ त्याला पाहवेना. आपल्या नेत्रांतील संतापरूपी अग्नीनें सर्व सृष्टि जळून खाक होईल या भीतीनें परम कारुणिक वृत्तीनें त्यानें आपलें नेत्र झाकून घेतले. अन्य एका ठिकाणीं क्षत्रिय वर्णा-बद्दल बोलतांना धर्मराज म्हणतो "वयं वधेन जीवामः" या त्याच्या उद्गारां-तील खोच ध्यानांत आल्यास धर्मराजाचें अंतःकरण किती उदात्त होतें हें समजूं शकेल! सभापर्वांतील त्याचें वर्तन त्याच्या या उदात्त सत्वशील वृत्तीला अनुसरूनच झालें आहे. अशा प्रकारें मुख आच्छादून वनप्रयाण केल्यानंतर सभापर्वांत जरी पुन्हां धर्मराजाचें दर्शन होत नाहीं तरी मानवी भावनांवर सत्वशीलतेच्या जोरावर विजय मिळविण्याचा त्याचा भव्य प्रयत्न पाहून त्याबद्दल अतीव आदर वाटूं लागतो.

## द्रौपदी

महाभारताच्या नायक पदाविषयीं धर्म कां कृष्ण असा प्रश्न निर्माण होऊं शकेल, कारण दोघांच्याहि बाजूनें बरेंच म्हणण्यासारखें आहे. परंतु नायिका म्हणून मात्र प्रामुख्यानें द्रौपदीचाच विचार करावा लागेल.

द्रौपदीसंबंधीं व पांडवांसंबंधीं आज वेगवेगळीं मतें पुढे येत आहेत. तथापि रूढ कल्पनेप्रमाणें द्रौपदी ही आदर्श भारतीय स्त्री म्हणून सुप्रसिद्ध पतिव्रतापंचकांत समाविष्ट झाली आहे. या पर्वांत तिच्याशी संबंध असलेला वस्त्रहरणाचाच प्रसंग प्रमुख आहे. व पांडवांनाहि निकरानें सूड घ्यावा अशी इच्छा होण्यास तोच प्रसंग कारणीभूत होतो. या प्रसंगांत द्रौपदीची भूमिका केवळ असहाय अशा अबलेची आहे. दुर्योधनाचा दुष्ट डाव ओळखून तिला

मरणप्राय दुःख होतें, ती युक्तिवाद लढवते, भीष्म द्रोणाकडे पण मदतीच्या अपेक्षेनें पाहते. पण "धृतराष्ट्र सत्त्वें सांडवला। पुत्र मोहें भ्रमें भुलला। भीष्महि स्वधर्मा भ्रंशला। सत्य साचार न बोले ॥" अशी एकंदर परिस्थिति असल्यानें तिचा निरुपाय होतो, व शेवटीं स्वलज्जारक्षणासाठीं कृष्णाची प्रार्थना करण्याविना तिला दुजा मार्ग न दिसावा यांत नवल नाहीं. तरी पण दुर्योधनानें मांडी उघडी करून बसण्याविषयीं जेव्हां सुचविलें तेव्हां तिच्या अंगाचा भडका उडाला, व "दुरात्मिया, ही वाणी। जळो तुझी पापिष्टा।" असे तेजस्वी उद्गार बाहेर पडले, व त्याही प्रसंगीं लग्नावर मृत्यूचें रूपक बसवून 'ते गदा घेऊनि मांडीवरी। रणमंचकी निद्रा करी'॥ असे बजाविते पण तिची असहायता ही संशयातीत असते व कृष्णाचा धावा ती करूं लागते. या द्रौपदीच्या धाव्यांत मुक्तेश्वरी प्रतिभेचा उन्मेष दिसून येतो. कृष्णाचा. धांवा करतांना दशावतारांतील कृष्ण कर्तृत्वाचा तिनें केलेला उल्लेख हा समर्पक वाटतो. तिचा भावनावेग कुठें लुप्त झाला आहे असें वाटत नाहीं.

प्रत्यक्ष वस्त्रहरणाला सुरुवात होण्यापूर्वी तिला श्रीहरी आपल्याला पावला अशी साक्ष पटते, व मग ती निश्चल राहते. पुढे धृतराष्ट्राला कृतकृत्याचा पश्चात्ताप होतो, व तो तिची "स्नुषामाजी तूं मुखरिणी। कौरवकुळां कुळतारिणी।' इ. स्तुति करतो, व वर माग म्हणून सांगतो. त्या वेळीं ती "पांचहि भ्रतार दासनामा— पासूनि मुक्त करावें।" इ. फक्त तीन वर मागते. कारण 'वरत्रय क्षत्रियातें। ब्राह्मणातें शतवर ॥'

मयसभा पाहण्यासाठीं दुर्योधन मागे राहिला असतां ती त्याची फसगत झालेली पाहून हसते, व त्या हसण्याचें मोल एवढे द्यावें लागतें. ती आदर्श स्त्री असते. धर्मराज तिला पणास लावण्यापूर्वी तिचें वर्णन करतो—'वेदींमध्या दीर्घकेशी। नित्यनूतना गुणैकराशी। पर्वतकन्येहूनि विशेषीं। कसी आगळी सुकुमारी ॥'

अशा प्रकारें द्रौपदीच्या ठायींची सत्वशीलता ठायीं ठायीं व्यक्त होते, आणि या सत्वशीलतेनें व विनयशालीनतेनें ती 'आदर्श' अशी भारत स्त्री आजपर्यंतहि कित्येकांना वाटत आली आहे.

मुक्तेश्वरानें कौरवसभेंतील या प्रसंगाचें अत्यंत बहारदार असें वर्णन केलें आहे. द्रौपदीची करुण मूर्ति डोळ्यांपुढे उभी राहते. द्रौपदीच्या स्वभाव-

रेखेची मूळ बैठक महाभारतकारांनीं आखून दिलीच आहे. पण तीमध्यें मुक्तेश्वरानें आपल्या कौशल्यानें जिवंतपण आणून दिलें आहे. क्षणामध्यें करुण, क्षणामध्यें नागिणीप्रमाणें चवताळलेली, क्षणामध्यें गुरुजनांच्या पुढें युक्तिवाद करणारी, भीमाकडे पाहून त्याच्या हृदयाचें पाणी करून सोडणारी अशी विविध स्वरूपी द्रौपदी मुक्तेश्वरानें अतिशय तन्मयतेनें रेखाटली आहे.

स्वभावचित्रे रेखाटण्यांत मुक्तेश्वराचें कौशल्य कसें सुस्पष्टपणे दिसून येतें हें धर्म व द्रौपदी या दोन स्वभावचित्रांच्या नमुन्यावरून आपण येथवर पाहिलें. या दोन प्रमुख व्यक्तिचित्रांशिवाय सभापर्वांत धृतराष्ट्र, दुर्योधन, विदूर, शिशुपाल, भीम, भीष्म इत्यादींचीहि व्यक्तिचित्रें मुक्तेश्वरानें मोठ्या कौशल्यानें रेखाटलीं आहेत. मूळ भारतामध्यें त्यांच्या स्वभावधर्माची वैशिष्टचें ठरवून दिलीं आहेतच. मराठी कवींनीं त्यामध्यें जवळजवळ बदल केलेला नाहीं. पण मूळकथेचा संकोचविस्तार करतांना आपल्या स्वतंत्र-प्रज्ञेचा त्यांनीं चांगलाच उपयोग केला आहे.

## भीम

शौर्य, क्रोध, स्वत्व, इ. गुण भारतकारांनींच दिलेले आहेत; पण त्या गुणांना विविध कृतींतून व संवादसंभाषणांतून अभिव्यक्ति देऊन भीमाची जिवंत मूर्ति आपल्यापुढें उभी करण्याचें कार्य मुक्तेश्वरानें यशस्वी रीत्या केलें आहे. जरासंधवधाचे वेळीं त्याचें शौर्य दिसून येतें. चौदा दिवसपर्यंत जरासंधाशीं लढणाऱ्या भीमाचें उग्ररूप कवीनें वाचकांच्या डोळ्यापुढें उभें राहील असें वर्णिलें आहे. स्वकालीन मल्लविद्येंतील डावपेचांचीं भर घालून मुक्तेश्वरानें भीम-जरासंध युद्ध व त्याद्वारां भीमाचें अचाट बल, यांची चांग-लीच कल्पना आणून दिली आहे.

राजसूययज्ञप्रसंगीं अग्रपूजाविधि चालू असतां शिशुपालानें कृष्ण-भीमांचा अपमान केल्यामुळे तो क्रोधानें उसळून जातो. एकदम युद्धाची भाषा बोलणाऱ्या दांडगेश्वर भीमाची बरोबर कल्पना येथें आपणांस येते. त्याच सभामंडपांत भोजनें चालू असतां कौरवांनीं द्रौपदीची चेष्टा करून तिला विविध पदार्थ एकदम वाढण्याचा गिल्ला करून गोंधळून सोडलें. श्रीकृष्णानें तिची त्या संकटांतून सोडवणूक केली व प्रत्येक भोजनवीराच्या पानांत भक्ष्य भोजनांचे पर्वत येऊन पडूं लागले. तेव्हां भीमसेन आपल्या

भाषणानें कौरवांची पांचावर धारण बसवितो. " भीम म्हणे सांडिता मूढा। शिखा उपटीन हस्तकें।" भीमाचा अडदांडपणा येथे चांगलाच प्रत्ययास येतो.

भीमाच्या स्वभावाचीं खरीं वैशिष्टयें द्यूतसभेमध्ये द्रौपदीला दुःशासनानें आणून उभी केली तेव्हां दिसून येतात. स्वाभिमान, दुःख, क्रोध, या त्याच्या भावना एकदम उसळून येतात. अविचारानें तो धर्माला शासन करावयास प्रवृत्त होतो. द्रौपदी त्याच्याकडे सक्रोध पाहते तेव्हां तर त्याच्या अंतःकरणांत ज्वालामुखी भडकतो या प्रसंगाचें त्याचें व्यक्तिचित्र मुक्तेश्वरानें अतिशय सुंदर रेखाटलें आहे. अशा क्रोधावेगांतच तो वनांत जातो. उसळत्या रक्ता-बरोबर त्याचे ठिकाणीं अलोट बंधुप्रेमहि आहे. अविचारानें जरी धर्मराजाला शासन करण्यास तो प्रवृत्त झाला तरी त्याची नीतिनिष्ठा व आज्ञाधारकपणा हे गुणहि सर्वत्र दिसून येतात. भीमाचें अत्यंत सुंदर ठसठशीत असें चित्र रेखाटण्यांत मुक्तेश्वरानें चांगलेंच यश संपादिलें आहे.

## दुर्योधन

भीमानंतर दुर्योधनाचें स्वभावचित्र डोळ्यापुढे येतें. पांडवांचें वैभव पाहून त्याच्या अंतःकरणांत मत्सराचा उदय होतो. राजसूय यज्ञसभेंत शिशुपालानें कृष्णाचें वैर मांडलेलें पाहून त्याला बरें वाटतें. त्याच्या स्वाभि-मानी मनाला द्रौपदीनें केलेला अपमान सहन झाला नाहीं. "राजसूय यज्ञ श्रियेचा खेद। अवमानाचा अतिविषाद। तेणे हृदयीं जातवेद। क्रोधरूपें भडकला।।" त्याच्या या मनःस्थितीचें अति उत्कृष्ट असें वर्णन मुक्तेश्वरानें केलें आहे. " तप्त लोह उष्णता गात्री। खादिरांगाररक्तता नेत्रीं। तीव्र श्वास टाकी वक्त्रीं। काळ सर्पासारिखा।। नेत्रद्वारा डळमळी नीर। दांत खाऊनी चावी अधर। मनगटें चाऊनि करी चूर। हृदय पिटी आक्रोशे" ।। यानंतर तो सर्व सुखांचा त्याग करतो व पांडवनाशाच्या एकच विचारांत मग्न होतो. शकुनीनें सुचविलेल्या कपटद्यूताची युक्ति दुर्योधन आपल्या पित्याजवळ प्रकट करून त्याची मान्यता मागण्याचा प्रयत्न करतो. पण त्यानें विरोध केल्यामुळें नाना प्रकारचा युक्तिवाद करून शेवटीं आपल्या दुष्ट कपटी डावाला धृत-राष्ट्राचा आशीर्वाद मिळविण्यांत तो यश संपादन करतो. पांडव जिवंत असतां आपलें वैभव कसें धोक्यांत आहे हें पित्याला पटवून देतांना तो ज्या प्रकारचा युक्तिवाद करतो त्यामध्यें मुक्तेश्वराचें बुद्धिवैभव दिसून येतें.

" सर्प फणीची शीतल छाया । तेथ मंडूकाची काया । निवोनि पावे विश्रांति ।।. . .शत्रु ऐश्वर्य पर्वतातळा । मस्तकीं अवमानाची शिळा । पडतां सोहोनि नृपाळा । धैर्य धरवे कवणातें ।। "

स्वाभिमानी दुर्योधन जणूं कांहीं मयसभेंत डिवचला गेला. त्याचा सूड म्हणूनच द्यूतसभेंत तो द्रौपदीची विटंबना करवितो. त्याच्या विविध हालचालींतून, संभाषणांतून, मुक्तेश्वरानें त्याचें स्वभावचित्र अत्यंत सुस्पष्ट असें रेखाटलें आहे.

धृतराष्ट्राच्या मनांतील सत्यनिष्ठा व पुत्रप्रेम यांचा संघर्ष कवीनें असाच सुंदर रेखाटला आहे. ' पुत्रप्रेमाची सांकडी । भंगू न शके ममता वेडी । बुद्धियुक्ती झाली कुडी । धृतराष्ट्राची ये काळीं ।। " या एका ओवींतच त्याच्या मनांतील संघर्ष कवीनें व्यक्तविला आहे.

अशा प्रकारें मूळ भारतामधील व्यक्तिचित्रांचे आराखडे घेऊन अनेक उपमा रूपकांच्या सहाय्यानें, भाषेच्या प्रभावीपणानें, मुक्तेश्वरानें तीं व्यक्ति-चित्रें जिवंत करून आपल्यापुढे उभीं केलीं आहेत. कोणतीहि भावना मूर्ति-रूपानें वाचकांच्या पुढें उभी करणें हें मुक्तेश्वराचें वैशिष्टच सभापर्वांतील स्वभावचित्रणामध्यें सर्वत्र दिसून येतें.

## सभापर्वातील रस व अलंकार

मुक्तेश्वराच्या कवित्वाचा विचार करतांना मागे आपण सभापर्वांतील रस व अलंकार यांचा थोडासा विचार केलाच आहे. येथें त्यांचें थोडेसें सविस्तर परीक्षण करूं.

महानुभावी वाङ्मयाचा अपवाद सोडल्यास एक रसात्मक अशा मराठी काव्यसरितेमध्यें विविध रसांचे मधुर प्रवाह आणून सोडण्याचें कार्य कविराज मुक्तेश्वरानेंच प्रथम केलें. या पूर्वीचें मराठी काव्य बव्हंशीं भक्तिरसात्मक आहे. जरी ज्ञानेश्वरांनीं शांत आणि अद्भुत रसांच्या पंक्तीला इतरहि रसांना आपल्या,काव्यांत स्थान दिलें आहे तरी तें महत्त्वाचें नाहीं. " जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा । आणि येरांही रसां पांति-करा । जाहला मानु ।। " असें असलें तरी "परि शांतांद्भुत बरवे," " शांतु शृंगारातें जिणें " असें ज्ञानेश्वरच म्हणतात. ब्रह्मशास्त्राची चर्चा हाच गीतेचा वा ज्ञानेश्वरीचा विषय असल्यानें त्यांत शृंगारादि इतर रसांनास्वतंत्र

वाव असणें संभवनीय नाहीं. त्यानंतरच्या संतमंडळींनीं तर ज्ञानेश्वरांइतकीहि रसिकता दाखविलेली नाहीं. एकनाथांनीं आपल्या कथाकाव्यांत विविध रसात्मक रचना केली आहे. पण त्यांचीहि भूमिका श्रीकृष्णा-रुक्मिणी यांचा विवाह म्हणजे जीव-शिवांचें ऐक्य हीच असल्यानें त्यांच्या काव्यांत वेदांतालाच प्राधान्य मिळालें आहे.

संस्कृत पुराणांतील विविध कथा आधाराला घेऊन मानवी मनोविकारांचा रम्य विलास आपल्या काव्यांत घडवून आणणाऱ्या मराठी कवींमध्यें मुक्तेश्वर हाच पहिला व सर्वश्रेष्ठ कवि होय. (नरेंद्र पंडित हा याला अपवाद आहे. मुक्तेश्वर व नरेंद्रपंडित यांची तुलना स्वतंत्रच प्रकरणांत केली आहे.) त्याचा काव्यहेतु व काव्यादर्श हे वेगळेच असल्यानें संस्कृत महाकवींना साजेशा बैठकीवरूनच त्यानें आपलें भारत रचिलें आहे. भारत कथेमध्ये असलेल्या शृंगार, वीर, करुण, इत्यादि रसांचे 'वडप' मुक्तेश्वरानें आपल्या काव्यामध्यें वाहविलें आहे. मानवी मनोविकारांचें काव्यांत वर्णन केल्यानें वाचकांचें मनोवृत्तींत जो आस्वाद्य अशी चेतना निर्माण होते तीच रसवृत्ति होय. मुक्तेश्वरानें आपल्या काव्यांत या मानवी मनोविकारांचें असें सूक्ष्म चित्रण केलें आहे कीं, तें काव्य वाचीत असतां वाचकांच्या ठिकाणीं त्या त्या मनोविकारांची चेतना इतक्या उत्कटतेनें होते कीं आपण त्या विकारांची प्रत्यक्ष मूर्तिच आपल्या डोळ्यापुढे पाहतों आहोंत कीं काय असें वाटतें. सभापर्वामध्यें याची प्रचीति वारंवार येते. मानवी मनोविकारांच्या उत्कट संघर्षाला भरपूर अवसर असल्यानें त्यांचा रम्य विलास येथें आपणांस पहावयास मिळावा यांत आश्चर्य नाहीं.

शृंगाराला मात्र सभापर्वात स्थान नाहींच असें म्हणावयास हरकत नाहीं. राजसूय यज्ञांतील भोजनप्रसंगीं मुक्तेश्वरानें जे पांचट वर्णन केलें आहे त्याची गणना शृंगारांत करतां येणार नाहीं. त्या वर्णनापासून एक प्रकारची जुगुप्साच निर्माण होते.

वीर, करुण, रौद्र, हास्य, शांत, अद्‌भुत इ. रसांचा मात्र अत्यंत मनोज्ञ असा आविष्कार या पर्वांत दिसून येतो. "पापबुद्धि दुर्योधनानें भर सभेंत आपली मांडी उघडी करून 'येऊनि बैसे मांडिवरी। होई अंतुरी पट्टाची।' असें म्हटल्याबरोबर दुःखातिशयानें गांगरून गेलेली आणि आपल्या अधोवदनानें भूलिंगावर अश्रुधारा धरणारी द्रौपदी डंवचलेल्या सर्पाप्रमाणें एकदम उसळते

व आकाशींची वीज कडकडावी त्याप्रमाणें होऊन " ते पापशब्द पडतां कानीं । हृदयीं धडकला क्रोध वन्ही । म्हणे दुरात्मिया तुझी वाणी । जळो भस्म होरे पापिष्ठा ॥ प्रळयवीज माथा पडो । दृष्टी जळोनि जिव्हां झडो । कायेपासूनि प्राण विघडो । ता कालिक पै तुझा ॥ . . ." हें याचें रौद्ररसाचें चित्र झालें. यांतील कवित्व व आवेश पाहून मन स्तब्ध होतें." जरासंध-भीम यांचें युद्धहि कवीनें असेंच वर्णिलें आहे. या वर्णनांत रौद्ररस मूर्तिमान अवतरला आहे. "मुष्टि घाताचिया ध्वनि । थरथराटे थरके धरणी । वोथरोनी पाताळ फणी । मार्ग पाहें पळावया ॥ कूर्म आंखडी हातपाय । वराह म्हणे 'मांडिले काय ? ।' दंष्ट्र स्तंभ भंगलिया भोय । केवीं थांबे तळवटी '. . . . . भीमें रगडोनिया दाढा । मध्यभागीं कर्षिला गाढा । माथा वाहोनिया भवंडा । चक्राकार दाविला । तेथोनि टाकिला भूतळीं । लात वोपिली वक्षस्थळीं । वज्रें तोडोनिया मौळी । शक्र भंगी पर्वता ॥ तेवीं पाडोनिया उताणा । वामपादे दक्षिण चरणा । रगडोनि, सव्य पाद जाणा । उभय हस्तीं कवळिला ॥ आंसडोनि बळउद्भटें ॥ मध्यें उघडिला तडतडाटे । अशुद्ध नदीचें खळखळाटे । रंग भूमिके लोटले . . .॥" अशा प्रकारचें हें भयंकर युद्ध चालू असतां शेवटीं कृष्णाच्या सूचनेवरून भीमानें जरासंधाचें शरीर दुभंगून, तीं दोन शकलें, डावें अंग उजव्या बाजूला व उजवें अंग डाव्या बाजूला, अशा प्रकारें टाकिलीं. यामुळें तीं पुन्हां एकत्र येऊं शकलीं नाहींत व जरासंधाला मृत्यु आला. या प्रसंगाचें अत्यंत रौद्र व भयानक असें वर्णन कवीनें केलें आहे. " तेव्हां भीमें फोडिली हांक । तेणें घाबरे तिन्ही लोक । अंगनाअंगीं भरला धाक । गर्भस्राव ओरसला ॥ म्हणती पृथ्वी दुभागिली । कीं ग्रहांची मंडलें खचलीं । कीं मेरूचीं शिखरें कोसळलीं । वज्रघात न लागतां ॥ "

शिशुपाल वध व जरासंधवध या दोनहि प्रसंगीं वीररसाचा असाच उठाव साधला आहे.

" भीमाअंगीं वीरश्रीचा लोटू । धरितां न धरवे अति उद्भटू । अगस्ती धांवे समुद्र घोटूं ॥ तैसा झगटे पुढारा ॥ दोघें पिटती पाणितळें । जानूमूळें बाहुमूळें । मही ताडितां पादतळे । शैल मौळे थरकती ॥ . . . सर्पा ऐसे स्फुस्कारिती । सिंहा ऐसे हुंकारती । वृषभा ऐसे फुंपाटती । उफाळती इसाळें ॥ या सारखीं भीम जरासंध युद्धांतील वर्णनें अगर अग्रपूजा समारंभाचे

वेळीं शिशुपालाची कृष्णनिंदा ऐकून सहदेव संतप्त झाला, त्यावेळचे त्याचे उद्गार हीं वीररसाचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत, " ऐसें बोलतां भीष्म धर्मातें। आवेश न धरवे सहदेवातें। गर्जे, उभारिलें हस्तें। म्हणे परिसा वडील हो ।। त्रैलोक्यनाथ चक्रपाणी। म्या पूजिला सभास्थानी। असो हें न मनी। त्याचा मूर्ध्नी। पायांतळीं माझिया ।। कृष्णी मानूनि विरोधू। वदेल कृष्णनिंदेचा शब्दू। तो तात्काळ पावेल वधू। माझेनि हस्तें जाणिजे ।। " अगर धर्मानें कृष्णाची अग्रपूजा केल्यामुळे मोठ्या आवेशानें सभेतून बाहेर पडणाऱ्या शिशुपालाचें वर्णन करतांना कवीनें मूर्तिमान वीररसच पुढे उभा केला आहे.

द्रौपदी वस्त्रहरण प्रसंगीं करुण रसाचा उठाव कवीनें अतिशय उत्कृष्ट-रीतीनें केला आहे. (या प्रसंगाचें सविस्तर रसग्रहण स्वतंत्र प्रकरणांत मागें केलेंच आहे.) द्रौपदीच्या रूपानें मूर्तिमान कारुण्य आपल्यापुढें उभे करण्यांत मुक्तेश्वरानें आपलें सर्वस्व पणाला लाविलें आहे आणि या कार्यांत तो संपूर्णपणें यशस्वी झाला आहे हें मान्य करावयास हरकत नाहीं. यांतूनच पुढें अद्भुत व शांत रसांचा उत्कर्ष झालेला आहे. हा प्रसंग सभापर्वाचा कळस आहे. या ठिकाणीं झालेला मानवी मनोविकारांचा मनोज्ञ विलास मुक्तेश्वराच्या प्रतिभेला साजेल असाच आहे.

मयसभा पाहण्यासाठीं दुर्योधन मागें राहिला होता. त्या सभेमध्ये मय दानवानें केलेल्या अद्भुत कारागिरीमुळे दुर्योधनाची जी फजिती झाली तिचें अतिशय सुंदर असें वर्णन कवीनें केलें आहे. हास्यरसाचा हा एक उत्तम नमुना आहे. " स्थळें असतां भासतीं जीवनें। चालतां शंकिजे दुर्योधनें। हस्तें सांवरितां वसनें। नव्हे म्हणती संगिये ।। स्फटिक वापिका उदक भरित। स्थळा ऐसिया नीट भासत। चालतां पडला वस्त्रासहित। निसरोनियां नेणतां।। भीमार्जुनासहित सकळीं। हास्य कीजे पिटोनि टाळी। असंख्य प्रमदेसीं पांचाळी। हास्य करी विनोदें ।।"

अशा प्रकारें मुक्तेश्वरानें सभापर्वांत विविध रसांची लयलूट करून सोडिली आहे. रसवत्ता हा जो त्याच्या काव्याचा विशेष गुण त्याचें येथें कांहींसें विस्तारानें अवलोकन केलें. आतां त्याच्या कल्पकतेचा विलास विविध अलंकाररूपानें येथें कसा व्यक्त झाला आहे तें पाहूं.

मुक्तेश्वराचा अत्यंत आवडता अलंकार म्हणजे रूपक हा होय.

त्याच्या काव्यांतील एक प्रसंगहि रूपकांच्या योजनेशिवाय जात नाहीं. साधीं साधीं वर्णनेंहि तो रूपकांच्या सहाय्यानेंच करतो. सभापर्वामध्यें त्याच्या कल्पकतेचा हा विलास ठायीं ठायीं दिसून येतो. रूपकांच्या जोडीला उपमा, उत्प्रेक्षा, अनन्वय, उदात्त, व्यतिरेक इत्यादि विविध अलंकारांचाहि त्यानें उपयोग केलेला आहे. पण मुक्तेश्वरी रूपकांची सर इतरांना येत नाहीं. स्वर्ग लोकांतून पंडूराजाकडून राजसूययज्ञ करण्याबद्दल धर्मराजाला निरोप आला. पित्याची ही इच्छा पूर्ण न केल्यास आपला जन्म व्यर्थ होय असें सांगतांना धर्मराज अनेक दृष्टांत देतो. "सुफळ न करितां पितृवचन। माझा देह भग्न भाजन । कां विधवेचें नव यौवन । कोणते ये उपयोगा ।। हिंवरतरूची शीतळ छाया । कीं नटामाजी नेटकी जाया । अनुपकारी नराची काया । वृथा पुष्ट ज्यापरी ।। " सहाव्या अध्यायांत जरासंधाच्या पित्याच्या निपुत्रिकत्वाचा धिक्कार करतांना त्याच्या तोंडीं कवीनें असेंच दृष्टांत घातले आहेत. द्यूतसभेमध्यें द्यूत खेळण्यासाठीं शकुनीनें जे फांसे तयार करविले होते त्यांचें वर्णन करतांना कवीनें ज्या उत्प्रेक्षा केल्या आहेत त्या त्याच्या विशाल कल्पकतेची साक्ष देणाऱ्या अशाच आहेत. त्या फांशांनीं सर्व पांडव कौरवांचा कुलक्षय घडवून आणिला. ते फांसे सभेमध्यें अवतरतांच सर्व सभा मुग्ध होऊन गेली. "कपटपाश पाहतां नयनीं । मुख स्तब्ध सभेचे " ते फांसे म्हणजे "मौनास्त्रविद्येची बीजाक्षरें । वर्णोक्त मंडित मनोहरें। मृत्यु सर्पाचीं दशनाग्रें। दंशावया पातलीं ।।' कळिपुरुषाचे तीक्ष्ण शर । लक्षूनि धर्माचें जिव्हार । विंधिलें म्हणोनि बुद्धि विचार । विफळ झाला ते काळीं ।। कीं पृथ्वीभार फेडावया । धरेसी वर दीधला राया । त्या विष्णूची महामाया । पाशरूपें प्रगटली ।।

कृष्णाच्या रथाचें वर्णन करतांना मुक्तेश्वरानें असाच सुंदर व्यतिरेक अलंकार साधला आहे. " उचैःश्रव्यातें दाविती मार्ग । चारी वारू अतिसवेग । सूर्य रथातें म्हणती व्यंग । एक चक्र म्हणोनी ।। " किंवा राजसूय यज्ञांतील भोजन पदार्थांचें वर्णन करतांना गव्हले व तूप यांचेंहि वर्णन अशाच सुंदर व्यतिरेकानें केलें आहे. गव्हल्यावरील उत्प्रेक्षाहि रम्य अशाच आहेत.

रूपक हा तर मुक्तेश्वराचा अत्यंत आवडता अलंकार होय. आदिपर्वांतील सुप्रसिद्ध अशा सृष्टिवर्णनामध्यें आलेलीं "कीं व्योमनर्मदेमाजी..."

किंवा "गगन समुद्रीं मुक्ताफळें..." यासारखीं रूपकें मुक्तेश्वराचें कल्पनावैभव दाखवितात. सभापर्वांतहि अशा रूपकांची कमतरता आहे असें नव्हे बारीक सारीक रूपकें तर शेकडोंनीं मोजतां येतील. पानापानावर त्यांची गर्दी झाली आहे. यांपैकीं कांहीं विशेष रूपकें येथें पाहूं. इंद्रलोकांमधील हरिश्चंद्राचें वर्णन अत्यंत सुंदर अशा रूपकामध्यें केलें आहे. "नरव्याघ्रें आपुल्या आंगें। त्रासूनि भूपाळ कस्तुरी मृगें। कीर्ती कस्तूरी भरली सुभगें। या ब्रह्मांड करंडी ॥ आवंतूनि अष्ट दिशा बाळी। मळवट रेखिला तिये भाळीं। जे क्षाळितां प्रळय जळीं। प्रक्षाळिलें न वचती ॥"

एकनाथांनीं रुक्मिणीस्वयंवरांत ज्या अध्यात्मिक रूपकांची पद्धति अवलंबिलेली दिसते, तिचाहि आश्रय मुक्तेश्वरानें अनेक ठिकाणीं केला आहे. श्रीकृष्णाच्या निवासस्थानाचें वर्णन मुक्तेश्वरानें कसें केलें आहे तें पाहण्याजोगें आहे. "वैराग्य वसंताचें स्थान। चिन्मय प्रकाश देदीप्यमान्।" अशा त्या सदना मध्यें "शुद्ध सत्त्वाची हंसतुळिका। उन्मनी उरुवार क्षीरोदका। धन चैतन्य सुमन कालिका।" अशा शय्येवर श्रीकृष्ण पहुडला होता. या कृष्णनिवासस्थानाचें दार मुक्तिरूपी दासी राखीत होत्या. शांतीरूपी रुक्मिणी त्याचीं पादपद्में संवाहन करीत होती. मुक्तेश्वराच्या या अध्यात्म रूपकांवर एकनाथी रूपकांची दाट छाया पडलेली आहे याचें प्रत्यंतर वरील रूपकांत तर येतेंच पण नवव्या अध्यायांतील पक्वान्नांच्या वर्णनांतहि येतें. "सत्व वृत्तिपूर्णपोळियां। स्वानंदबोधें पूर्ण भरतिया। त्यामाजी भजन भूतदया। येळामिरीं मघमघितीं ॥"

सभापर्वांतील रूपकांमध्यें अतिशय सुंदर व मुक्तेश्वराच्या प्रतिभेची अतिभव्य विशालता दाखविणारीं अशीं जीं दोन प्रसिद्ध रूपकें आहेत, तीं म्हणजे भीमाच्या गदानोवरीचें व द्रौपदीच्या धाव्यांतील दशावताराचें, हीं होत. दुर्योधनानें द्रौपदीला आपल्या मांडीवर येऊन बसण्याची निर्लज्ज मागणी केल्यामुळें खवळलेली द्रौपदी उसळून त्याला प्रत्युत्तर देते, "भीमा करीं जे केळवली। गदानोवरी सगुणाथिली। वाग्निश्चयें तुज नेमिली। गोत्रघटित निर्धारें। बहुलें योजिलें रण तळवट। आयुष्य अवधीचा अंत्रपाट। हातें सारूनि बळी वरिष्ट। लग्न लावील स्वहातें ॥ रक्त हरिद्रा तनुलेपनीं ॥ माथां अक्षता पायपिटणी। स्त्रिया प्रलाप वाद्यध्वनी। सुखसोहळा भोगसी।

ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करीं । प्राण पारखे दवडूनि दुरी । मग एकांतीं पहुडे कां ।। ” या परंपरित रूपकांतील कल्पनेची विशालता महाकवीला साजेल अशीच आहे.

दुसरें रूपक याहिपेक्षां विशाल असें आहे. मुक्तेश्वरी प्रतिभेचा अतिशय रम्य असा विलास या रूपकांत दिसून येतो. द्रौपदी श्रीकृष्णाचा धावा करीत आहे. परमेश्वरानें भक्तांच्या संकटविमोचनाचें व्रतच घेतलेलें असल्यामुळे यापूर्वी दुष्टदमनार्थ त्यानें अनेक अवतार धारण केलें आहेत, तेव्हां आतांच्या या प्रसंगीं त्यानें वस्त्रावतार घेऊन आपली लज्जा रक्षण करावी असें ती त्याला विनवीत आहे. भरसभेमध्यें दुःशासन द्रौपदीची विटंबना करीत आहे, या प्रसंगावर अत्यंत कौशल्यानें मुक्तेश्वरानें दशावताराचें रूपक बसविलें आहे. दुःशासनरूपी शंकासुरानें द्रौपदीचे स्मरणसंतोषरूपी वेद कौरवसागरांत बुडविले; अशा प्रसंगीं श्रीकृष्णाशिवाय ते कोण वर काढूं शकेल असें ती विचारते. (शंकासुरानें वेद समद्रामध्यें बुडविल्यामुळें देवानें मत्स्यावतार घेतला व ते वर काढले. हा देवाचा प्रथमावतार.) पूर्वी समुद्र मंथनप्रसंगीं देवानें कूर्मावतार घेतला या प्रसंगाला उल्लेखून द्रौपदी म्हणते, “ माझा स्वधर्म रूपी मंदरपर्वत कौरवसागरांत बुडतो आहे; त्याचा उद्धार करण्यासाठीं हे केशवा ! तूं कूर्मावतार धारण करून ये, व माझ्याकडे कांसवीच्या दृष्टीनें पहा ” (कासवी आपल्या दृष्टीनें पिलांना पोसते अशी कल्पना आहे.)“ माझी लज्जारूपी पृथ्वी दुःशासनरूपी हिरण्याक्ष रसातळाला नेत आहे तेव्हां तूं वराहरूपानें तिचा उद्धार कर; दुःशासनरूपी हिरण्यकश्यपु माझ्या भावरूपी प्रल्हादाला पीडा देत आहे, नरसिंहरूपानें तूं त्यांचें संरक्षण कर. . . ” अशा प्रकारें कृष्णाची प्रार्थना करून तिनें दशावतारांतील देवाच्या भक्तवात्सल्याची त्याला आठवण करून दिली. हें दशावताराचें विशाल रूपक मुक्तेश्वराच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाचें अमर चिन्हच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या पुढील “ माझें मानस सरोवर । प्रेम कल्हारीं सुमनोहर । राजहंस रुक्मिणीवर । सदा स्वानंदें क्रीडसी ।। आजी गेलासी कवणे ठाया ? । मुक्त मुक्ताफळें चाखाया । ” हें रूपक तर मुक्तेश्वरांच्या प्रतिभेचें नवनवोन्मेषशालिनी स्वरूप स्पष्ट करतें. महाकवीच्या प्रतिभेशिवाय अन्यत्र असा उन्मेष सांपडणें असंभवनीय आहे.

महाकवींच्या संकेताप्रमाणें आपलें काव्य रसालंकार मंडित असावें अशा धोरणानेंच मुक्तेश्वरानें आपल्या महाभारतामध्ये अगदीं मुक्त हस्तानें त्यांचा उपयोग केला आहे. त्यामुळेंच त्याची भारतकथा अत्यंत रसाळ आणि विदग्ध अशी झाली आहे. त्याच्या भारतकथेचें पट आर्षमहाकाव्यांच्या जातीचें असून त्यावर विदग्ध महाकाव्यांतील लालित्याची कलाकुसर काढलेली आहे असें रूपकान्वित भाषेत म्हटल्यास फारसें वावगे होईल असें वाटत नाहीं. मुक्तेश्वराच्या रसालंकारमंडित शैलीचा हा योग्य गौरवच होईल असें वाटतें.

---

## अर्थ व स्पष्टीकरणें

[ येथें सभापर्वातील कांहीं महत्त्वाचे व कठिण असे उतारे नमुन्यादाखल दिले आहेत. सामान्यपणें ज्या उताऱ्यांत स्पष्टीकरणाला अवसर आहे असेच उतारे येण्याचा संभव अधिक. त्यांतील पौराणिक वा इतर जातीच्या निर्देशांचा संपूर्ण खुलासा करून ओव्यांचा शब्दशः अर्थ द्यावा.

### ( १ ) अध्याय १ ला : ( ओव्या १९–२२ )

या ओव्यांमध्ये मुक्तेश्वर आपल्या मराठी ग्रंथरचनेचें समर्थन करीत आहे. महाभारताचें महत्त्व सांगून संस्कृतांतील भारत कथा आपण मराठीमध्ये आणली आहे, तिचा रसिकांनीं स्वीकार करावा असें तो या ठिकाणीं सांगत आहे.

व्यासकृत मूळ संस्कृत भारत म्हणजे ऊंस; हा व्यासभारतरूपी ऊंस गाळून त्या अत्यंत मधुर अशा सारांशरूपी खडीसाखरेपासून तयार केलेले लाडू म्हणजेच आपले मराठी भारत असें कवि म्हणतो असे हे मिष्ट लाडू सुज्ञ माणसें जर स्वीकारणार नाहींत तर त्यांच्या या कृतीचें दुराग्रहाशिवाय कसें समर्थन करतां येईल ? मराठींतील कांहीं उणीवांकडे दुर्लक्ष करून विद्वानांनीं आपल्या मराठीभारत कृतीचा स्वीकार करावा हें सांगण्यासाठीं कवि एक दृष्टांत देत आहे. चंद्राच्या अंगावर डाग आहेत म्हणून त्याच्या

किरणांतून स्रवणाऱ्या तेजामृताचें प्राशन करून जगणारे चकोरपक्षी त्याचा त्याग करतात काय ? रसिक पंडितांनीं मराठी भारताबद्दल अशी चकोर सदृश वृत्ति दाखवावी असें कवि म्हणतो. आणखी एका रूपकाच्या सहाय्यानें कवि हाच आशय व्यक्त करीत आहे. 'व्यासकृत मूळ संस्कृत भारतरूपी पर्वतांतील सोन्याचा गोळा गाळून मी माझ्या कल्पनेप्रमाणे मराठी भारतरूपी रत्नजडित असा हा अलंकार केला आहे. हें कर्णभूषण मी आपल्याला लेववीत असतां, रसिक श्रोते हो ! असे कान बाजूला कां फिरवितां ?' असें कवि विचारतो. (ज्ञानेश्वरांना ज्याप्रमाणें मराठींतील गीतार्थाचें समर्थन करून रसिक पंडितांचीं मनें आपल्याकडे वळवावीं लागलीं त्याप्रमाणेंच मुक्तेश्वराचें हें बोलणे आहे. अर्थात् त्याचें हें बोलणें कांहींसें औपचारिक आहे हें " असो हे उपचाराचिया गोष्टीं।" या पुढील ओवीवरून दिसून येतें.)

## (२) अध्याय १ ला : (ओव्या २४–२६)

अशा तऱ्हेचें प्रास्ताविक औपचारिक निवेदन केल्यानंतर सभापर्वामध्ये आपण कोणता कथाभाग सांगणार आहोंत हें या ओव्यांमध्यें मुक्तेश्वरानें अध्यात्मिक रूपकाच्या द्वारा सांगितलें आहे. सात्त्विक भाव हेच कोणी पांडव, सद्भावना ही त्यांची पत्नी द्रौपदी; काम क्रोधरूपी दुष्ट कौरवांनीं तिला द्यूतसभेमध्ये पीडा दिली, तिचा छळ केला; या सद्भावनारूपी द्रौपदीनें सावधानरूपीवस्त्रें परिधान केली पण (आत्मतत्त्वाच्या प्राप्तीला सावधानचित्ताची आवश्यकता आहे. गीतेमध्यें ज्ञानप्राप्तीला आवश्यक म्हणून सांगितलेल्या १८ गुणामध्यें चित्ताचें स्थैर्य म्हणून जो गुण सांगितला आहे तोच हा चित्ताचें हें स्थैर्य ढळविण्याचें कार्य विकल्प करीत असतो.) विकल्पदुःशासनानें त्या वस्त्रांचें अपहरण करण्याचा प्रयत्न केला. पण निश्चय विचाररूपी श्रीकृष्णानें (विकल्पानें चित्ताचें स्थैर्य ढळतें व ज्ञानप्राप्ती दूर जाते. अशा वेळीं आत्मविनिग्रह या गुणाची आवश्यकता असते.) ती सावधनतेचीं वस्त्रें सद्भावनारूपी द्रौपदीला पुन्हां पुन्हां नेसविलीं; ही कथा येथें आपण ऐकावी असें कवि श्रोत्यांना विनवितो. आपली ही भारत कथा आळस झोप टाकून आत्मज्ञानाची प्राप्ती करून घेऊं इच्छिणाऱ्या साधकानें ऐकिली तर त्याचें तापत्रय (अधिदैविक, अध्यात्मिक, अधिभौतिक) नाहींसें

होईल. (एकनाथांची ही अध्यात्मिक पद्धति मुक्तेश्वरानें अनेक ठिकाणीं उपयोगांत आणिलेली आहे.)

( ३ ) अध्याय १ ला : (ओव्या ६८–७१ )

मयासुरानें विनवणी केल्यावरून मयसभेची भव्य रचना करावयास सांगून श्रीकृष्ण पांडवांचा निरोप घेऊन द्वारकेला परतले. या ओव्यांमध्यें द्वारका नगरीचें महात्म्य कवीनें वर्णिलें आहे. वास्तविक पाहतां आत्मस्वरूपी परब्रह्म शून्यस्वरूपी वैकुंठामध्यें वास्तव्य करतें. हें ब्रह्म निर्गुण निराकार असें आहे म्हणूनच तें ' शून्यशेजिये ' राहूं शकतें. पण त्या ब्रह्माला सगुण रूप धारण करण्याची इच्छा झाली म्हणून तें द्वारकावतीमध्ये कृष्णरूपानें अवतरलें. द्वारकेची वस्ती अत्यंत सुखदायक (सुरवाड) वाटल्यावरून तें निर्गुण परब्रह्म सगुणस्वरूपी वतनदार होऊन तेथें अवतरलें. ही द्वारका म्हणजे मोक्षाप्रत पोंचविणारी सातवी पायरीच आहे. वाराणसी (काशी) ही मोक्षमार्गावरील चौथी पायरी मानली जाते. तिच्या वरील तिसरें स्थान द्वारकेचें आहे. (अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका, द्वारावती; या सात पुऱ्या मोक्षाच्या सात पायऱ्या होत.) अशा या द्वारकेमध्ये ज्ञान स्वरूप परमात्मा वास्तव्य करून राहतो. या त्याच्या निवासस्थानाचें वर्णन करणें अशक्य आहे. त्याचें स्वमुखानें वर्णन करण्याचा प्रयत्न केल्यामुळें वेद खंड-विखंड झाला; (वेद प्रथम एकच होता पण या प्रयत्नामुळें त्याचे चार तुकडे झाले), आणि अनंत म्हणजे शेष (याला हजार जिभा आहेत अशी कल्पना) या द्वारावतीचें वर्णन न करतां आल्यामुळें पाताळाच्या गुहेमध्यें लाजेनें दडून बसला. जें आत्मस्वरूपी परब्रह्म ध्यानानें व्यक्त करतां येत नाहीं आणि शास्त्रांच्या परिशीलनानेंहि समजून घेतां येत नाहीं, तें या द्वारकावासी जनांना प्रत्यक्ष दृष्टिगोचर होत आहे.

(४) अध्याय ३ रा : (ओ. १९ )

मयसभादर्शनाचा समारंभ चालू असतां नारद महर्षि तेथें अवतरले. धर्मानें त्यांना आसन देऊन त्यांची पूजा केली धर्मराजाला अनेक प्रश्न विचारण्याचें निमित्त करवून भारतकारांनीं येथे नारदां-कडून राजधर्माचें विवेचन करविलें आहे. राजानें कोणते गुण अंगीं बाणले

पाहिजेत, राज्य रक्षणासाठीं कोणते उपाय योजिले पाहिजेत आणि कोणत्या प्रकारें आपपर बलाबलाची परीक्षा केली पाहिजे हें या ओळींत सांगितलें आहे. राजाचे अंगचे सहा गुण (१) उत्तम वक्तृत्व, (२) शत्रूला वर मान काढूं न देणारे स्वसामर्थ्याचें प्रभावी प्रदर्शन, (३) दूरदृष्टि, (४) प्रखर स्मरण-शक्ति, (५) पूर्वानुभवावरून अचूक अनुमानें काढूं शकणारी तर्कबुद्धि, (६) राजनीतीमध्ये पारंगता. (काव्यसंग्रहकारांनीं याच प्रकारचे सहा गुण दिले आहेत ते असे, वक्ता, प्रगल्भ, मेधावी, स्मृतिमान्, नयविद आणि कवि. कांहीं टीकाकारांनीं येथें --(१) संधि, (२) विग्रह, (३) यान, (४) आसन, (५) द्वैधीभाव, (६) आश्रय हे षड्गुण दिले आहेत. पण याच प्रकर-णांत ४१ व्या ओवींत यांचा कवीनें स्वतंत्र उल्लेख केला आहे. म्हणून या ठिकाणीं प्रथम सांगितलेले षड्गुण घेणेंच जास्त बरें.

या षड्गुणांप्रमाणेंच त्याचेजवळ सप्तउपाय असावेत. साम, दान, दंड, भेद, मंत्र, औषध, इंद्रजाल, या उपायांनीं त्यानें आपलें राज्य राखावयाचें असतें. त्याचप्रमाणें राजानें आपलें व शत्रूचें बलाबल नेहमीं तुलना करून पहावें. हें बलाबल पाहण्याचीं चौदा स्थानें आहेत, तीं अशीं: (१) देश, (२) दुर्ग, (३) रथ, (४) हत्ती, (५) घोडे, (६) योद्धे, (७) राज्याधिकारी, (८) अंतःपुर, (९) अन्नव्यवस्था, (१०) अश्वरथादिकांचा पुरवठा, (११) नीति, (१२) जमाखर्चाचा हिशेब, (१३) द्रव्य पुरवठा, (१४) गुप्त शत्रु. (याहि ठिकाणीं संख्या गणनामध्यें घोटाळा झालेला दिसतो. अंगबळ, सेनाबळ, कोशबळ, ... इत्यादि. मुक्तेश्वरानें ४४ व्या ओवींत स्वतंत्रपणें दिलेलीं बलाबलाचीं स्थानें कांहींजण येथेंच घेतात. असें घेतल्यास ४१–४५, या ओव्या १९ व्या ओवीच्या खुलाशासाठीं आल्या आहेत असें समजावें लागतें.)

## (५) अध्याय ३ रा : (ओव्या ४०–४६)

वरील संदर्भांतच या ओव्या आल्या आहेत. १ संधी--अन्य राजाशीं मैत्री, २ विग्रह–अन्य राजाशीं युद्ध, ३ यान–स्वारी करणें, (४) आसन–सुरक्षित जागीं राहणें, ५ द्वैधीभाव--फितुरी, ६ आश्रय, --आपल्यापेक्षां प्रबल राजाचा आश्रय घेणें–हे षड्गुण; साम दान दंड भेद इंद्रजाळ, मंत्र, औषध हे सप्तउपाय, व आपपराचें बलाबल पाहण्याचें (१९ ओवी पहा) चौदा

प्रकार कुशल पंडितवर्यांनीं सांगितलेले आहेत. अन्य ग्रंथकारांनीं बलाबल पाहण्याचे आणखी चौदा प्रकार दिले आहेत तेहि तुला सांगतों ते ऐक असें नारद म्हणतात. तीं चौदा बलस्थानें अशीं (१) अंगबळ, (२) सेनाबळ, (३) कोशबळ, (४) दुर्गबळ, (५) शस्त्रबळ, (६) मंत्रबळ–सल्लामसलत, (७) प्रधानबल, (८) सुहृदबल, (९) (१०) (११) वेदत्रय बल–– आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, (१२) बुद्धिबल, (१३) ब्राह्मणशेषसुकृतबळ ––ब्राह्मणांच्या पुण्याचा राजास मिळालेला हिस्सा, (१४) अन्य राजांचे बळ. अशा या चौदा बलस्थानाच्या अवलोकनावरून राजाला आपपर बलाबल ओळखतां येतें. नारद धर्मराजाला विचारतात ' तूं ' 'हें केलें आहेस ना?'

## (६) अध्याय ३ रा : (ओव्या १३१–१३२)

नारद धर्मराजाला विचारीत आहेत " पत्नी, संपत्ती, वेद व अध्ययन यांच्या बाबतींत तुझ्या कामना सफळ आहेत ना ? " (' सफळ दास ' हा पाठ बरोबर नाहीं. 'सफळ दारा' हा पाठ योग्य आहे.) या बाबतींत सफळ असणे म्हणजे काय तें मी तुला उघड करून सांगतों ' असें म्हणून नारद म्हणतात, स्त्रीच्या ठिकाणची सफलता रतिसुखांत व पुत्रामध्ये आहे; वेदाची सफलता अग्निहोत्रांत आहे, द्रव्याची सफलता दान देणें व उपभोग घेणें यांमध्ये आहे. आणि उत्तम शील व वर्तन हें श्रूताचें म्हणजे अध्ययनाचें फल होय. हे राजा ! तुला या सर्व प्रकारची फळप्राप्ती झाली आहे ना ?"

## (७) अध्याय ३ रा : (ओव्या ४७–५१)

वरील संदर्भांतच या ओव्या आल्या आहेत. राजाचे प्रमुख अधिकारी कोण, त्यांच्यावर कशी देखरेख असावी, शत्रूच्या कोणकोणत्या अधिकाऱ्यांवर देखरेख असावी इ. विवेचन या ओव्यांत आलें आहे.

या 'अधिकाऱ्यांना ' तीर्थ ' असें नांव भारतकारांनीं दिलें आहे. यांच्या गुणोदकामध्ये स्नान घडलें असतां मन सुस्नात होतें. (ज्ञान संपन्न होतें, पवित्र होतें). राज्याचा खरा आधार म्हणजे स्वामी, अमात्य, सुहृद, कोश, राष्ट्र, दुर्ग, राजपुत्र व कलत्र (स्त्री). यांच्या वरच राज्याचें स्थैर्य अवलंबून असतें; मग तो काळ शांततेचा असो अगर युद्धाचा असो. यानंतर आणखी विशिष्ट संस्थांबद्दल राजानें कसें जागरूक असलें पाहिजे तें सांगितलें

आहे. शत्रूचें मित्र आणि मित्राचे शत्रू यांच्याशिवाय परपक्षांतील आणखी १८ जणांच्या बद्दल काळजी घ्यावयास हवी. त्यांच्यापासून राजाच्या विहाराला धोका असण्याचा संभव आहे. परपक्षांतील १८ व स्वपक्षांतील १५ व्यक्तींचा येथें उल्लेख आहे. १ मंत्री, २ पुरोहित, ३ युवराज, ४ सेनापती, ५ द्वारपाल, ६ अंतःपुररक्षक, ७ तुरुंगाधिकारी, ८ धन वसूल करणारा अधिकारी, ९ धन खर्च करणारा अधिकारी, १० उपदेशक, ११ नगर स्वामी (नगराध्यक्ष), १२ कामें नेमून देणारा अधिकारी, १३ धर्माध्यक्ष, १४ सभाध्यक्ष, १५ दंडपाल, १६ किल्लेदार, १७ सरहद्दरक्षक, १८ अरण्यपालक. मुक्तेश्वरानें स्वपक्षांतील १५ व्यक्तींचा उल्लेख करतांना परपक्षांतील अठरामधून राजपुत्र, कलत्र, सुहृद हे वगळावेत असें म्हटलें आहे. पण या वरील अठरांमध्ये कलत्र व सुहृद हीं दिलेलीं नाहींत. अन्य ग्रंथकारांनीं मंत्री, पुरोहित व युवराज यांना वगळून बाकीच्या १५ चा उल्लेख केला आहे. (मंत्री पुरोहितश्चैव युवराजश्चभूपतिः। पंचमो द्वारपालश्च षष्ठोऽतर्वेशिकस्तथा ।। कारागाराधिकारी च द्रव्य संचय कृत्तथा । कृत्याकृत्येषु चार्थानां नवमो विनियोजकः। प्रदेष्टानगराध्यक्षः कार्य निर्माण कृत्तथा । धर्माध्यक्षः सभाध्यक्षो दंडपाल स्त्रिपंचमः ।। षोडशो दुर्गपालश्च तथा राष्ट्रांतपालकः। अटवी पालकांता नि तीर्थान्यष्टादशैवतु ।।) वरील अठरामधून मंत्री, पुरोहित व युवराज हे वगळून बाकीच्या १५ स्वपक्षीयांवरहि नजर असावी असें ज्ञाते लोक सांगतात. (राजपुत्र, कलत्र, सुहृद यांचें जीवन राजावर सर्वस्वी आधारलेलें असतें. आपल्या मरणानें त्यांचें मरण ठरलेलेंच असतें. तेव्हां त्यांचा विकल्प मानण्याचें कारण नाहीं.)

## (८) अध्याय ५ वा : (ओव्या १६–२१)

धर्मराजानें विचारल्यावरून लोकपालसभांचें वर्णन करीत असतां इंद्रसभेंतील हरिश्चंद्राचा नारदांनीं उल्लेख केला. आपला पिता पंडुराजा मात्र यमसभेंत, व हरिश्चंद्र इंद्रसभेंत का ? असें धर्मानें विचारल्यावरून नारद हरिश्चंद्राच्या महिम्याचें वर्णन करीत आहेत. हरिश्चंद्रराजा हा एकरथी नरकेसरीच आहे. त्यानें आपल्या पराक्रमानें कोटयवधि राजेरूपी हत्ती पराभूत केले आहेत. त्या नृप कुंजरांचा उन्मत्तपणा आणि गर्वरूपी गंडस्थळें भेदून त्यांची संपत्ति रूपी मुक्ताफळें सर्वत्र विखुरलीं. अनेक ब्राह्मणकुळें ती संपत्ति

नेतां नेतां थकून गेलीं. (मदोन्मत्त व गर्विष्ठ राजांना हरिश्चंद्रानें जिंकून त्यांची संपत्ति ब्राह्मणांना वाटली ) या हरिश्चंद्ररूपी वाघानें राजेरूपी कस्तुरी मृगांना संत्रस्त करून आपली कीर्तिरूपी कस्तुरी या ब्रह्मांड करंडकांत भरली. अष्टदिशारूपीं बालिकांना बोलावून आणून त्यानें आपल्या कीर्तिरूपी कस्तुरीचा मळवट त्यांचे कपाळीं भरला. हा कीर्ति कस्तुरीचा मळवट प्रलयकालच्या सागरांनींहि पुसला जाणें शक्य नव्हतें. (त्याची कीर्ति अष्टदिशांना पसरली व तीं कालाच्या अंतापर्यंत लुप्त होणे शक्य नाहीं असा भाव.) या कीर्ति कस्तुरीचा काळेपणा आकाशापर्यंत पसरला, तिचा सुगंध सर्वत्र पृथ्वीवर पसरला, आणि हीच कीर्ति कस्तुरी शाईच्या रूपानें सर्वत्र पुराणांतून दृष्टीस पडते. (दिगंता-पर्यंत त्याची कीर्ति पसरली. सर्व पुराणें त्याच्या कीर्तीचें गान करीत आहेत असा भाव) २१ व्या ओवींत चंद्र व हरिश्चद्र यांची तुलना केली आहे. चंद्राचा धवल प्रकाश हीच त्याची चंदन उटी व त्याच्या वरील डाग हीच कस्तुरी. 'हरिश्चंद्र' या नांवांतील 'हरि' शब्दानें चंदनाच्या उटीचा बोध होतो. चंद्रावरील डागाप्रमाणे हरिश्चंद्रानें कीर्तिकस्तुरीचा टिळा लावलाच होता. हरिश्चंद्र व चंद्र यांच्या नांवांतील अर्थ संबंध नीट स्पष्ट व्हावा म्हणूनच चंद्राचे ठिकाणीं धवलिमा व कृष्णकलंक हीं दोन चिन्हें प्राप्त झालीं असा भाव. यांतील कविकल्पना अत्यंत रमणीय आहे.

## (९) अध्याय ५ वा : (ओव्या १०७–१०९)

धर्मराजाला नारदांनीं पंडुराजाचा निरोप कथन केल्यानंतर धर्मराजानें राजसूय यज्ञाचा विचार चालविला व याबाबत सल्ला घेण्यासाठीं श्रीकृष्णाला बोलावणें पाठविलें. धर्मराजाचें बोलावणे आलेलें पाहून अविलंबें करून गेलें पाहिजे या विचारानें कृष्ण हस्तिनापुरास यावयास निघाला. कृष्णाच्या रथाचें या ठिकाणीं अध्यात्मिक रूपकाच्या सहाय्यानें वर्णन केलें आहे. निर्मळ अंतः-करणानें केलेलें भजन हाच त्याचा रथ, श्रीकृष्णाचें मन हेच त्याचे चार घोडे, भक्ताची एकनिष्ठा हेंच आसन व समाधी हाच हौदा. सुविचार हा कुशल सारथी, नियमरूपी लगामांनीं घोडे आवरावयाचे, चतुर विवेक सुविचाराच्या जवळ बसलेला होता. शम दम ही दोन चाकें, विकल्प रूपी खडकांचा तीं चूर करीत होतीं. अशा तऱ्हेनें तो रथ वासनारूपी नद्यांचें तीर सहज ओलांडून जात होता. (श्रीकृष्ण प्राप्ती कोणत्या साधनांनीं होऊं शकेल हें येथें सांगितलें आहे.)

## (१०) अध्याय ६ वा : (ओव्या ७७–८०)

श्रीकृष्ण , भीम व अर्जून हे तिघे जरासंधाचा वध करावयास गेले तेव्हां कसें दिसले याचें वर्णन येथें केलें आहे. भीम व अर्जून हे दोघे शिष्य झाले व श्रीकृष्ण हा गुरूप्रमाणे दिसला. हे तिघेजण अग्नित्रयाप्रमाणे दिसले. (गार्हपत्य, आवहनीय, व दक्षिणाग्नि असे तीन अग्नि कल्पिले आहेत.) मागधेश्वराला ––जरासंधाला दग्ध करण्यासाठीं जणूं हे तीन अग्नीच चालले होते असे श्रीकृष्णभीमार्जुन दिसले. अगर संसाररूपी भयंकर शत्रूचा नाश करणारे वैराग्य, विवेक ज्ञान या तीन साधनांप्रमाणे ते तिघेजण दिसले. तीन अग्नि ज्याप्रमाणे इष्टिसाधना (याग) करतात त्याप्रमाणे श्रीकृष्ण भीमार्जुनासह जरासंधाला मारावयाला (साधाया) जातांना शोभला. ('इष्ट' हा पाठ चुकीचा आहे. 'इष्टि' म्हणजे याग हा पाठ बरोबर आहे.) [ या ओवीचा अर्थ देतांना कांहीं टीकाकारांचा घोटाळा झाला आहे. "इष्टित्रयांत जशी अग्नीची साधना करतात" असें उपमान कित्येकांनीं घेतलें आहे. तें चुकीचे आहे. 'त्रयजातवेदु' (=तीन अग्नि) असेंच घ्यावयास हवें. श्रीकृष्ण, भीम, अर्जुन हे तीन अग्नि. जरासंधाच्या वधानें इष्टिसिद्धि करावयाची आहे.] श्रीकृष्ण भीमार्जुन कसे दिसले हे दुसऱ्या उत्प्रेक्षेनें कवि सांगत आहे. जरासंधरूपी मदनाला भस्म करावयासाठीं कुबेरमित्र जो शंकर त्यानें आपले तीन डोळेच कृष्ण, भीम, अर्जुन यांच्या रूपानें उघडले होते अथवा पापनाशानासाठीं गंगानदी स्वर्ग, मृत्यु पाताळ या तीन लोकांत रूपत्रयामध्यें चालली होती. (त्रिपथगा = गंगा––'क्षितौ तारयते मर्त्यान्नागांस्तारयतेऽप्यध:। दिवि तारयते देवास्तेन त्रिपथगा स्मृता ॥)

## (११) अध्याय ९ वा : (ओव्या ११७–११८)

राजसूय यज्ञामधील भोजनसमारंभाचें वर्णन करतांना विविध पक्वान्नांचीं अध्यात्मिक रूपकांचे द्वारां वर्णनें केलीं आहेत. सात्त्विक वृत्ति म्हणजेच पुरणपोळ्या, त्या पोळ्यांतील पुरण म्हणजे आत्मानंद, आणि या आत्मानंद रूपी पुरणाला लावलेल्या, भजन आणि भूतदया या वेलदोडे आणि मिरी यांचा घमघमाट सुटलेला होता. कुशल हातांनीं गव्हल्याच्या खिरींतील गव्हले वळले होते. कांहीं हरिणांच्या शिंगांच्या आकाराचे दिसत होते, तर कांहीं (धवल अशा) गंगानदीमध्ये विकसलेल्या कमलांप्रमाणें दिसत

होते. (गंगानदी दुधाप्रमाणें पांढरी आहे अशी कल्पना—" श्रीकृष्ण मूर्ति यमुना, गंगे! श्रीशंभुर्मूर्ति तूं धवळा; " मोरोपंत : गंगेची प्रार्थना) कांहीं गव्हले मोत्यांना लाजवतील असे शुभ्र होते, कांहीं स्वयंभू उज्ज्वलतेचेच बनविले होते; कांहीं दुधानें धुतलेल्या मऊ सुताप्रमाणें होते. ते गव्हले त्यांच्या शुभ्रतेमुळें क्षीरसागरामध्यें जणुं कांहीं तारांगणाचें प्रतिबिंबच पडलें आहे असे दिसत होते; किंवा ते गव्हले म्हणजे ब्रह्मानंदांत विलीन झालेल्या भिन्न देहांच्या आकृतीच असें वाटत होतें.

ते गव्हले म्हणजे अमृतामध्यें आळविलेलीं मोत्येंच असें म्हटलें तर कांहीं सूक्ष्मदृष्टीच्या रसिकांना हा दृष्टांत मानवणार नाहीं. कारण मोतीं जरी अमृतांत आळविले तरी ते कठीणच राहणार; पण गव्हले मात्र खाण्याला अत्यंत कोमल व मृदु होते. (व्यतिरेक अलंकार)

## (१२) अध्याय १० वा : (ओव्या १६–२२)

राजसूय यज्ञप्रसंगीं धर्मराजानें अग्रपूजा कोणाची करावी असा प्रश्न विचारला तेव्हां भीष्माचार्यांनीं कृष्णाचें नांव सुचविलें. कृष्ण अग्रपूजेच्या मानास योग्य कां याचें त्यांनीं कारण दिलें आहे. मूळांत तें थोडक्यांत आहे. मुक्तेश्वरानें आपल्या कालविचारानुसार, हें कृष्ण वर्णन केलें आहे व तें भीष्माच्या तोंडीं घातलें आहे. मुक्तेश्वराचें हें पदरचें आहे. श्रीकृष्ण हा कोण आहे तर त्रैलोक्यरूपी नगराचा अभिस्तंभ आहे. म्हणजे मुख्य वेशीच्या अग्रभागीं असणारा हा खांब आहे (कदाचित् वेशीजवळ असे खांब असावेत.) संसाररूपी विराट वृक्ष आहे त्याचा हा कोंभ आहे. ॐकाररूपीं पर्वतशिखरावरचा हा महादेव आहे, व ज्ञानदृष्टीनेंच त्याचें दर्शन होतें अशी त्याची योग्यता आहे. वैकुंठरूपी संपुष्टांत (संपुटा आंतौती) ही अर्चनमूर्ति, श्रेष्ठ भक्तांनी ठेविली; (श्रीकृष्णाचें निवासस्थान वैकुंठ आहे.) परंतु सनकसनंदनादिक भक्तांनीं तिची प्रतिष्ठापना स्वहृदयसांबळींत (देवाची उपकरणी ठेवावयाची पेटी तिच्यांत) केली आहे. हरि व हर या दोहोचें हृदयध्यान (ध्यानमूर्ति) हेंच. नारदादिक याचीच स्तुति गातात. हें सगुण स्वरूपांत दिसत आहे, पण वास्तविक हा कृष्ण म्हणजे निर्गुण ब्रह्मरूपी असून चैतन्यरूप आहे. विश्वाचा विस्तार ज्या मायेच्या योगानें झाला त्या मायेचा उगम ह्याच रूपांतून होतो. वेद रूपी वेलीचें हेंच फळ (वेदांचा रोख परमेश्वर वर्णनावर आहे). विश्वस्वरूपाचें

ज्ञान झाल्यानंतर जी केवलावस्था (तदाकारता) प्राप्त होते, त्या अवस्थेच्या गाभ्यांत असलेला आत्मस्वरूपी ठेवा (निधान) म्हणजे हा परमेश्वर श्रीकृष्ण. शैव, वैष्णवादि दर्शनग्रंथांतून नानाप्रकारांनीं ज्याचें वर्णन केलें तोच हा अनंत. (त्यांना तों तसा भासला) वेदान्तशास्त्रांत यास ब्रह्म म्हणून संज्ञा आहे. मीमांसक (मीमांसा ग्रंथ लिहिणारे लेखक) याला कर्म म्हणून संबोधतात. (यज्ञयागादि कर्मांत हाच मुख्य), नैय्यायिक यास कर्ता, व ईश्वर म्हणतात. सांख्य तत्त्वज्ञानांत कपिलमुनीनें ज्यांचा पुरुष व प्रकृति असा उल्लेख केला ते म्हणजे हीं श्रीकृष्ण व रुक्मिणी होत. जगाचीं मातापितरें हींच. भाष्यकार (पतंजलि–पातंजल भाष्य) याला 'शब्द' म्हणतात, तर हटयोग्यांची योगसाधना–याच्यासाठीं असते. या ठिकाणीं निरनिराळ्या तत्त्वज्ञानांचा उल्लेख मुक्तेश्वरांनीं केला आहे व त्यांत कालविपर्यासाचा भाग अर्थात्‌च खूप आहे. नैय्यायिक व भाष्यकार महाभारत काळानंतरचेच आहेत.

## (१३) अध्याय १० वा : (ओव्या ४३–५०)

श्रीकृष्णाच्या पार्थिव देहाचें हें वर्णन आहे. पहिल्या ओवींत नखांचें वर्णन आहे. श्रीकृष्णाचीं नखे इतकीं तेजस्वी व गोल होतीं, कीं करवतीनें चंद्राचे १० तुकडे करून बसविलेत कीं काय असें वाटत असे. ही उपमा एकदेशी आहे करवतीनें दहा तुकडे केलें असतां ते नखांप्रमाणे कसे दिसतील हें समजत नाहीं. त्यापेक्षां चंद्रानें एकेक कला दिली असें म्हटलें असतें तर तें अधिक योग्य झालें असतें. नंतरच्या ओव्यांतून कृष्णाच्या हातांतील ध्वज अंकुशादि वस्तूंचें वर्णन केलें, व तें करीत असतां समुचित असा गौरवार्थ बसविण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. पापांचे पर्वत वज्रानें भंग केले. पद्मांतून कमलनिवासिनी लक्ष्मी हिचें आस्तित्व सुचविलें जात होतें, ऐश्वर्यमदानें व विषयभोगानें जे उन्मत्त झाले होते त्यांचा समाचार अंकुशानें घेतला, व त्यांस कृष्णभक्त बनवलें. हरिचरणांना भवसागरांतील नौकेची उपमा दिली आहे. संसारसागर, कृष्णचरणाशीं स्वतःस वाहिल्यानें तरून जातां येतो असा अर्थ. या नौकेवरील ध्वज म्हणजे श्रीकृष्णदेह. कृष्णाच्या पादरूपीं कमलाजवळ त्रिवेणी संगम झाला आहे कीं काय असें वाटे. रक्तवर्ण तळवे हे सरस्वतीप्रमाणें भासत होते, पायांत वाक्या होत्या त्या गंगाप्रवाहाप्रमाणे भासत. अव्यंग असा जानुद्वय हाच यमुनेचा निळसर प्रवाह. प्रयागला हा त्रिवेणी संगम होतो म्हणून ते पवित्रचरण प्रयागराज तीर्थाप्रमाणें भासले.

## (१४) अध्याय १० वा : (ओव्या ७५–७८)

कृष्णाची अग्रपूजा झालेली पाहून कौरव व शिशुपाल यांना फार वाईट वाटलें. कृष्णपूजेसारखा पवित्र सोहळा त्यांत अमंगल काय असावयाचें? पण त्यांना तसें वाटलें. हाच भावार्थ मुक्तेश्वरानें समकालीन धार्मिक भेदांचा आधार घेऊन वर्णिला आहे. शैव हे शंकरास श्रेष्ठ दैवत मानतात. व त्यांच्या मतें शंकराची (काशी विश्वेश्वराच्या लिंगाची) पूजा सुवर्ण-कमलानीं करणे हें महत्पुण्यकारक व पापक्षालक आहे. परंतु नवीन पाखंडी मतवादी लोकांस, व वैष्णवांना मात्र हीच संतापजनक वाटते. कारण त्यांच्या मतें श्रीकृष्ण हाच सर्वश्रेष्ठ देव, हा संताप कसा असतो तर पूर्वसंचित धन चोरीस जावें म्हणजे जसें वाटेल तसें वाटतें. त्याचप्रमाणे विष्णूची (बिंदु-माधव) मूर्ति सजविलेली पाहून जटाधारी असे कापालिक लोक व जंगम, हे शंकरभक्त असतात त्यांना शिरच्छेदनवत् दुःख होतें. म्हणजे शिवाव्यति-रिक्त इतर देवांची उपासना चाललेली पाहण्यापेक्षां शिरच्छेदन बरें. या ठिकाणीं शैव, वैष्णव, कापालिक, पाखंडी इत्यादि मतांचे लोक हे अर्थात् भारतकालीन आहेत असेंच मानण्याचें कारण नाहीं.

## (१५) अध्याय १० वा (ओव्या : १३६–१३७)

भीष्मांनीं कृष्ण विरोधकांची निर्भत्सना करण्यासाठीं कृष्ण हा सिंह आहे व विरोधक हे कोल्हे आहेत असे उद्‌गार काढले. ते शिशुपालास पटले नाहींत, व त्यानें या ओवींत 'असें आम्हांस शृगाल (कोल्हे) व कृष्णास सिंह म्हणण्यास लाज वाटत नाहीं का ?' अशी पृच्छा केली. पूतनावध, तसेंच अश्वासुर, वृषभासुर, वत्सासुर व अधासुर, शकटासुर, बकासुर या राक्षसांचा कृष्णानें निःपात केला होता, यांचा उल्लेख केला. या पराक्रमानें त्याला श्रेष्ठ म्हणतोस काय असें विचारतो. शिशुपालाचे मतें या राक्षसांचा वध हा श्रीकृष्णानें अन्यायानें केला आहे व आणखीहि असे इतर उल्लेख आहेत. ते शिशुपालाचें मतें निर्भत्सनापूर्ण असले तरी कवीला मात्र त्यांत कृष्णभक्ति व गौरव हे गुण दिसतात.

## (१६) अध्याय ११ वा : (ओव्या २९–३४)

भीष्मानें केलेल्या कृष्णस्तुतीनें रागावून शिशुपाल भीष्माची निर्भत्सना करतो व ती करतांना त्यानें भीष्माला भूलिंग शकुनी पक्ष्याची उपमा दिली आहे. भूलिंग शकुनी हा साहसी पक्षी, सिंह निद्रिस्त असतां उघड्या असलेल्या त्याच्या तोंडांत शिरून दातांत अडकलेले मांसाचे कण भक्षण करतो. पण पुढें त्याला सिंहाची लुसलुशीत जीभ खाण्याचा मोह होतो व त्या प्रयत्नांत तो सिंहमुखीं सांपडतो. शिशुपालाचे मतें भीष्म हा भूलिंग शकुनी आहे व कौरवरूपी सिंहाच्या तोंडांत तो प्रवेश करतो व त्या अन्नावर राहतो आहे. भूलिंग शकुनीप्रमाणेंच भीष्माचा शेवट होणार.

## (१७) अध्याय १२ वा : (ओंव्या ८–१३)

राजसूय यज्ञ संपतेकाळीं निरनिराळ्या दुश्चिन्हांचा प्रत्यय आला. तेव्हां धर्मराजानें नारदांस त्यांचा अर्थ विचारला, तेव्हां नारदांनीं व्यास तुला तो कथन करील असें सांगितलें. त्यावरून व्यास कथन करीत आहे. मूळांत हें अत्यंत थोडक्यांत आहे. पण मुक्तेश्वरानें स्वतःच्या बुद्धीनें विस्तारशः वर्णन केलें आहे. ईश्वर निष्ठुर कीं कृपाळु व काळ केव्हां काय करील हें समजेनासें झालें आहे. या ठिकाणीं काव्यसंग्रहकारांचा 'काय करील केव्हां काळु' हाच पाठ अधिक योग्य दिसतो. विष्णुमायेचा महिमा कळणे कठिण. तिच्यायोगानें विवेकशक्ति नष्ट होऊन मनुष्य भ्रांतचित्त होतो. 'जे विचारी पाडोनि ब्रह्मा' हा पाठ अयोग्य दिसतो, कारण ब्रह्मदेवाचा उल्लेख येथें आवश्यक नाहीं. नळराजा व रामचंद्र यांनाही अशी भुरळ पडून त्यांचेकडून अपाय झाले. कित्येक वेळीं, पुण्यमार्गानें वागूनहि मोठीं दुःखें प्राप्त होतात. तर कित्येकांकडे पाहून असें वाटतें कीं पापामुळेंच ते सुखांत आहेत. मनु आदि ऋषि व वेद यांचा अभिप्राय पाप केलें असतां दुःख होतें व पुण्यानें सुख प्राप्त होतें असा आहे. पण पापपुण्याचें स्वरूप अगम्य आहे. पापवर्तनानें पुण्यप्राप्ति होते, तर पुण्यवर्तनानें पाप लागतें, "पापीं पुण्य पुण्यिं पाप।" या पाठापेक्षां सर्वसंग्रहाचा 'पापी,पुन्हां पुन्हां करी पाप' हा पाठ अधिक बरोबर वाटतो. कारण पहिला पाठ घेतला तर द्विरुक्ति होते. अधर्मांतच एखाद्याला धर्म वाटतो. एकाचे विहित (योग्यकृत्य) अनेकांचें मतें अयोग्य असतें व तशा वर्तनांतच बहुतेकांस समाधान वाटतें.

## (१८) अध्याय ११ वा (ओव्या १४–१५)

पापपुण्यासंबंधीं निश्चित नियम सांगतां येत नसल्यानें ती ईश्वरगम्य गोष्ट असें धरून चालून सुज्ञ लोक, वेदवाक्याला प्रमाण मानतात. खोल विचार करून जेव्हां कांहीं निश्चित ज्ञान (साक्षी) हातीं लागत नाहीं, तेव्हां माणसें प्रारब्धवादी होतात. ज्याप्रमाणे समुद्रांत भ्रमण करणारा पक्षी कुठें झाडा-झुडुपाचा आधार मिळत नाहीं असें पाहून, एखाद्या जहाजाच्या डोलकाठीवर विसावतो. त्याप्रमाणे माणसांची अवस्था होते. तेव्हां अशा परिस्थितींत माणूस दैवाला प्रमाण मानतो. यापेक्षां अधिक कांहीं सांगतांच येत नाहीं. कारण खोल ज्ञानाच्या दृष्टीनें पाहूं गेल्यास तेंहि भ्रमजन्यच आहे असें दिसून येईल.

## (१९) अध्याय १२ वा : (ओव्या २४८–२४९)

शकुनीच्या साहाय्यानें कपटद्यूताचा बेत दुर्योधनानें निश्चित केला व तें वर्णन पुढें येणार आहे अशी पुढील कथाभागाची सुरुवात करून मुक्तेश्वरानें या ओव्यांतून आपलें मनोगत व्यक्त केलें आहे. रेणुका ही कवीची कुलस्वामिनी दिसते, व तिच्या पीठाचें वर्णन हें आहे. या ठिकाणीं काव्यसंग्रहकारांचा "परडी भरी" हाच पाठ युक्त दिसतो. कवि श्रोत्यांना (संतांते) उद्देशून म्हणतो.' "मी प्रार्थनारूपी परडी भरली आहे व आनंदाचा उदो (उदय) इच्छितो. आपल्या अवधानाचा मी भुकेला आहे व तो जोगवा मला तुम्ही घाला." प्रार्थनेची परवडी करी–सुखसमृद्धि करतो–असें म्हणणे संदर्भास सुसंगत दिसत नाहीं. 'प्रार्थनेच्या पुष्पांनीं मी परडी भरतो' असाहि अर्थ घ्यावा. जोगवा म्हणजे एक प्रकारची भिक्षा व ती कोणत्यातरी भांड्यांत घेतात, तेव्हां त्याही अर्थानें 'परडी' शब्दच योग्य दिसतो. श्रोते व त्यांची अनुज्ञा हेंच मूळ पीठ. तुमचे हृदयाचा अनुकार हेंच लक्ष्य म्हणजे आदिस्थान तुमची कृपा-रूपी रेणुकादेवी आमच्यावर प्रसन्न होवो.

## (२०) अध्याय १४ वा : (ओव्या २६–२९)

द्यूताला सुरुवात झाल्यावर फासे बाहेर काढले गेले त्यांचें हें वर्णन आहे. फाशांवर कवीनें निरनिराळ्या उत्प्रेक्षा लढविल्या आहेत. ते फासे पांढऱ्या रंगाचे होतें, मोठे वितीएवढे रुंद व चार धारांनीं युक्त होते. त्यांवर

सोन्याच्या रसानें अक्षरें लिहिलीं होतीं. अक्षदशनीं ऐवजीं राक्षस दशनीं सुद्धां चालेल, कारण राक्षसांच्या दाढांप्रमाणे ते होते असा अर्थ घेतां येईल. हें फाशांचें वर्णन झाल्यावर पुढे त्यांवर उत्प्रेक्षा आहेत. हे फासे म्हणजे जणूंकाय संमोहन विद्येचीं बीजाक्षरें होतीं. कारण सर्वांवर एक प्रकारची मोहिनी (भुरळ) पडली व द्यूताचा कोणी निषेध करीना असें झालें. किंवा मत्युसर्पाचे हे दांत चावावयास सज्ज झाले कां, कलिपुरुषाचे हे तीक्ष्ण बाण होते व त्यांनी धर्मराजाचें मर्मस्थान विंधिलें कीं, त्याची विचारशक्ति नष्ट व्हावी. किंवा विष्णूची महामाया पृथ्वीवर झालेला दैत्यांचा भार कमी करण्यासाठीं त्या फाशांच्या रूपानें प्रकटली. अशा ह्या फाशांवर तीनचार उत्प्रेक्षा आहेत. त्या अर्थातच कवीच्या आहेत, मूळांतील नव्हत.

## ( २१ ) अध्याय १५ वा : (ओव्या ५७–६०)

धर्मराजानें द्यूतामध्ये सर्वस्व घालवून शेवटीं द्रौपदीहि घालविली. द्रौपदीला द्यूतसभेमध्यें आणून कौरवांनीं तिची विटंबना चालविली; ती पाहून भीमाला क्रोध आवरेना. तो गदा घेऊन दुर्योधनाचा कपाळमोक्ष करण्यासाठीं सरसावून पुढें चालला, तेव्हां धर्मराज त्याला शांत राहण्याबद्दल विनवीत आहे. सत्य-पालनासाठीं रामचंद्र, हरिश्चंद्र, शिबीराजा यांनीं काय काय केलें हें सांगून धर्मराज भीमाला सत्यपालनाचा उपदेश करीत आहे. रामचंद्रानें सत्याचें रक्षण करण्यासाठीं अरण्यवास पत्करला; पित्याचा अंत झाला तरी त्यानें सत्याची मर्यादा उल्लंघन केली नाहीं. हरिश्चंद्रानें स्वप्नांतील खोट्या भ्रमजन्य गोष्टी खऱ्या मानून विश्वामित्राला राज्य दान दिलें, त्याची कीर्ति सर्व ग्रंथकर्ते वर्णन करितात. ( शिबीनें सत्य पालनासाठीं स्वमांस दिलें. शिबी राजाची परीक्षा पाहण्यासाठीं इंद्र व अग्नि श्येन कपोतांचीं रूपें घेऊन दोघेहि त्याच्याकडे आले. कपोताला राजानें आश्रय दिला. श्येनानें कपोत हा आपलें भक्ष्य म्हणून आपणांस मिळावा अशी त्याच्याकडे मागणी केली; अथवा त्याच्याऐवजीं राजानें कपोताच्या वजनाचें स्वतःच्या शरीरांतून मांस काढून द्यावें. राजानें आपलें सर्व शरीर त्यास दिलें व सत्याचें पालन केलें.) दधीचि ऋषीनें देवांना आपलीं हाडें दिलीं. (याच हाडांचे विश्वकर्म्यानें वज्र तयार केलें व इंद्रानें त्याच्या सहाय्यानें वृत्रासुराचा वध केला. श्रियाळ

राजाला शंकरानें असेंच सत्व पाहण्यासाठीं छळलें. पण त्यानें न डगमगतां आपला पुत्र स्वहस्तें वधून शंकराला नरमांस वाढलें.)

## (२२) अध्याय १५ वा : (ओव्या ११२–१५)

दुर्योधनानें द्रौपदीला आपल्या मांडीवर येऊन बसण्यास सांगितल्यामुळें नागिणीप्रमाणे खवळून ती त्याला प्रत्युत्तर देते. "भीमाच्या हातांत जी गदा आहे तीच तुझी नोवरी. तिचा तुझ्याशीं विवाह निश्चित झाला आहे. तिला लग्नाचें केळवणसुद्धां घातलें आहे. ही गुणयुक्त अशी नोवरी, हे दुर्योधना ! तुला वाग्निश्चयानें नेमिली आहे. तुझें व तिचें गोत्र व घटित जुळणारें असें आहे. (जन्मकालावरून ठरविलेला अनुकूल भाव म्हणजे घटित) रण हेंच बोहलें; आयुष्यमर्यादा हा अंतःरपाट (म्हणजे तुझें आयुष्याचा अंत्रपट दूर झाल्याबरोबर तुझी व त्या नोवरीची भेट होईल---तुला गदेचा प्रसाद मिळेल.) बलवान् भीम स्वतःच्या हातानें तो आयुष्य अंत्रपट दूर सारून तुझ्याशीं तिचें लग्न लावील. रक्त हेंच लग्नांतील हळद, डोक्यावर लत्ता प्रहार याच अक्षता, कौरवस्त्रियांचा शोक हाच वाद्यध्वनि; अशा सुख सोहळ्यांत तुझें गदानोवरीशीं लग्न होईल. ती गदानोवरी मांडीवर घेऊन रणमंचकावर तूं खुशाल निद्रा कर. आणि स्वतःचे प्राण आपल्यापासून दूर पाठवून अगदीं एकांतांत गदा-नोवरीसह निद्रा कर." (परंपरित रूपकाचें सुंदर उदाहरण)

## (२३) अध्याय १५ वा : (ओव्या १६३–६८)

द्रौपदीनें वस्त्रहरण प्रसंगीं श्रीकृष्णाचा धावा केला. तो त्याला द्वारकेंत कसा ऐकूं गेला हें सांगून कवीनें श्रीकृष्णाच्या द्वारकानगरींतील त्याच्या निवासस्थानाचें अध्यात्मिक रूपकाच्या द्वारां येथें वर्णन केलें आहे. द्रौपदीच्या मुखरूपीं तोफेपासून सुटलेला शब्द गोळा श्रीकृष्णाच्या कानावर जाऊन आदळला व हृदयाला भिडला. (तो शब्द गोळा (धावा) तिच्या कारुण्य तेजानें रंगलेला होता. बालसूर्याप्रमाणे लाल असा तो दिसत होता.) श्रीकृष्ण त्यामुळे आपल्या सुखनिद्रेंतून खडबडून जागा झाला. निर्गुण अशा द्वारकानगरींत, निर्विकल्प तरूंच्या उद्यानांत ध्यानस्वरूपरूपीं रत्नसदनांत समाधीच्या शेजेवर श्रीकृष्ण झोपला होता. वैराग्यरूपी वसंत ऋतूचें स्थानच होतें. तें श्रीकृष्णाचें निवासस्थान परब्रह्माच्या चिन्मय प्रकाशानें

प्रकाशित झालें होतें. असें तें आनंदस्वरूपी सदन जणूं काय शिवाचें मनच होतें. तें निवासस्थान सर्व मांगल्याचें मंगलस्थानच होतें. पुण्यतरूचें आगरच होतें. आणि त्या परमात्म्याच्या वास्तव्य स्थानाजवळ चारी मुक्ती पहारा करीत होत्या. द्रौपदीनें धावा केला त्या वेळीं श्रीकृष्ण शुद्ध सत्त्व गुणाच्या पराच्या गादीवर (हंसतुळिका) उन्मनीचें मऊ रेशमी वस्त्र आंथरून त्यावर धन चैतन्याच्या कोमल पुष्पकलिका आच्छादून झोपला होता. (एकनाथांनींहि द्वारकानगरीचें वर्णन अशाच अध्यात्मिक रूपकांनीं केलें आहे.)

---

## मूळ कथानक व मुक्तेश्वरानें केलेले प्रमुख फेरबदल

### प्रास्तविक:

प्राचीन कवींनीं महाभारत रामायण या महाकाव्यांतून कथानकें घेतांना कांहीं एक विशिष्ट धोरण ठेवलें होतें असें दिसतें. अगदीं पहिला महत्त्वाचा भाग म्हणजे प्राचीन कवींनीं साधारणपणें महाभारत रामायण यांमधील कथानकाचा धागा न बदलतां तसाच द्यावयाचा असें ठरविलेलें असावें. संस्कृतांतल्या कथा ह्या सामान्य लोकांना समजत नाहींत, म्हणूनच केवळ त्या प्राकृतांत आणावयाच्या अशी भूमिका ह्यांची होती. म्हणजे त्यांचे काव्यग्रंथ हे रामायणमहाभारतावरील टीकात्मक ग्रंथ नव्हत. किंबहुना मूळ कथासूत्र घेऊन आपल्या मताप्रमाणें, काळाप्रमाणें पुष्कळ फिरवाफिरव त्यांत करावयाची, हाहि प्रकार त्यांनीं फारसा अवलंबिलेला नाहीं. कारण तसें करतांना कांहीं तरी रचनासौंदर्य आणणें वा कलात्मकता आणणें अशा प्रकारची भूमिका लागते ती प्राचीन कवींची होती असें दिसत नाहीं आणि त्यामुळे प्राचीन कवींच्या रामायणभारताच्या प्रतिकृति ह्या जवळजवळ मूळाबरहुकूम आहेत असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. आज आपल्या दृष्टीनें रामायणमहाभारताची मूळ म्हणजे अधिकृत कथा कोणती, व कोणती प्रत ही अधिकृत धरावयाची, हा प्रश्न निर्माण होतो. प्राचीन कवींपुढें तसा प्रश्न उभा राहिला असेल कां नाहीं हें कळण्यास कांहीं मार्ग नाहीं; पण त्यांनीं स्वतःला मिळालेली वा स्वतः अभ्यासलेली प्रत अधिकृत धरलेली दिसते. तेव्हा आजच्या दृष्टीनें कांटेकोरपणें त्यांच्या-

पुढें कोणती प्रत होती हें समजणें कठिण आहे. प्रत्यक्ष कथाभागावरून काय अनुमानें निघतील त्यांवर अवलंबून राहणें क्रमप्राप्त आहे.

याचा अर्थ असा नव्हे की, मूळ कथावस्तूमध्यें मराठी कवींनीं कांहींएक फरक केला नाहीं. संस्कृत मूळ काव्यें हीं आदर्श खरीं, पण तीं लिहिल्यापासून मराठीकवींच्या काळापर्यंत कांहींएक बदल घडून आलेला होता व त्यास अनुसरून मूळकथेला थोडी मुरड घालणें हें पण आवश्यक होतें. अर्थात ज्या मराठी कवींनीं अशाप्रकारें रामायणभारतांतल्या कथा निवडल्या त्यांचा संस्कृत साहित्यशास्त्राशीं थोडाबहुत परिचय होता व त्याचा परिणाम काव्यावर होणें हें पण अपरिहार्य होतें; व तसा फरक झालेला आहेहि. सर्व साधारण दृष्टीनें पाहतां, जेव्हां थोडें तत्त्वज्ञान सांगावयाचें असेल, जेव्हां एकाद्या प्रकरणांत एकादा रस विशेष भरला आहे असें कवीला वाटलें असेल, व जेव्हां परमेश्वराची प्रत्यक्ष भक्ति करण्याची संधि लाभली असेल त्या वेळीं मराठी कवि मूळापासून खूपच वेगळें व जास्त लिहितात; अशाप्रकारचीं उदाहरणें प्रत्येक कवीच्या काव्यांत बरींच सांपडतात. शिवाय मूळ महाभारत हें एक लक्ष श्लोकांइतकें प्रचंड असल्यानें त्याचें तसें रूपांतर करणें हेंहि एका कवीच्या शक्तीपलीकडचें, अतएव अशक्य होतें; व म्हणून फरक होणें हें ओघानेंच येतें. प्रस्तुत ठिकाणीं मुक्तेश्वराच्या सभापर्वाचा प्रामुख्यानें विचार करूं.

मुक्तेश्वरापुढें आजच्या उपलब्ध प्रतींपैकी, जो नीलकंठी प्रत म्हणून प्रसिद्ध आहे ती होती असें मानतां येतें. या प्रतींत सभापर्वांत ८१ अध्याय आहेत; चिं. वि. वैद्यांनीं संपादिलेल्या प्रतींत पण ८१ अध्याय आहेत; पण श्लोकसंख्या जरा अधिक आहे. भांडारकर प्रतींत मात्र ७२ च अध्याय आहेत व श्लोकसंख्या पण ४०० नी कमी आहे.

'किंचित् कामप्रवेदनें। ऐसे बोलती पंडित शहाणे,' ह्या मुक्तेश्वरीवचनाचें मूळ " कच्चिदति कामप्रवेदेन" ..इ. त सांपडतें त्यावरून त्याचेपुढें कोणती प्रत असावी या बाबत तर्क करतां येतो. यानंतर प्रत्येक अध्यायांतील मुक्तेश्वराचा व त्यानें वगळलेला भाग पाहणें जरूर आहे.

मयसभेचें वर्णन मुळांत विस्तारानें आहेच व तें तसेच आणलें आहे. त्यांत कवीला विशेष फरक करावासा वाटला नाहीं. पुढें कश्चित् प्रश्नांत मात्र

मूळांत नारदाच्या प्रश्नाबरोबर युधिष्ठिरहि एक प्रश्न विचारतो अशी रचना आहे,तो युधिष्ठिराचा प्रश्न मात्र संक्षेपास्तव, मुक्तेश्वरानें गाळला आहे.'दाऊनि योगियाचें चिन्ह' या ओवींतील ढोंगी योग्यांच्या बाबतचा ग्राम्य उल्लेख व पुढच्या ओवींतील दुर्बळांना नाडणाऱ्या धनिकांचा, व मातापित्यांना टाकून सासू सासऱ्यांना घरीं ठेवणाऱ्या (पुरुषां)चा उल्लेख, हे मुक्तेश्वराचे स्वतःचे आहेत. त्यावरून त्याला स्वतःला काळानुसार कांहीं भर घालावयाची होती हें स्पष्ट दिसतें.

लोकपाल सभा या मूळास धरून आहेत, पण नारद पंडूचा निरोप सांगतात त्यावेळीं धर्मराजाला सुपुत्राचीं कर्तव्ये व कुपुत्राचीं लक्षणें यांचें स्मरण होतें; तें सर्व मुक्तेश्वराचें स्वतःचें आहे. त्यांतील ग्राम्य उल्लेखांवरूनच हें स्पष्ट होतें. याच पांचव्या अध्यायाच्या शेवटच्या भागांत कवीनें आपली भूमिका अधिक स्पष्ट केली आहे.

'व्यास वाढितां जगांतें । ग्रास लागला जीर्ण कवीते ... । त्याचे मुखीचीं उच्छिष्ट शितें ।' .. या उल्लेखावरून इतरांची भारतावरची रचना कवीनें पाहिली असावी असें दिसतें व नंतर तर विंध्यादेवीचा दृष्टांत देऊन— " एकएक अक्षरांची भीक । जीर्ण कवींतें मागून देख । .." असा विनयपूर्ण उल्लेख त्यानें केला आहे.

जरासंधाच्या कथानकांत कवीचा भाग बराच आहे. भीम व जरासंध यांची कुस्ती मुक्तेश्वरानें रस घेऊन विस्तारानें वर्णन केली आहे पण कथासूत्र मुळास धरून आहे. शेवटी भीमाला जेव्हा जरासंध हटेना तेव्हां कृष्णानें एक पान (खजूरीचें) अर्धे फाडून विरुद्ध दिशांस टाकलें, इ प्रवाद आहे असा तत्कालीं रूढ असलेला प्रवाद कवि देतो व वर "परि हें व्यास ऋषीश्वरें कथिलें नाहीं भारती ।। " असें बजावतो

राजसूय दिग्विजयांतला राजांसंबंधींचा भाग हा मूळास धरून आहे; अर्थात ज्या ठिकाणीं कवीनें कालविपर्यास करून यवन, म्लेंच्छ, इंग्रज इ. चा उल्लेख केला आहे तो सरळ मुक्तेश्वराचा भाग आहे हें स्पष्ट आहे. हें दिग्विजयाचें वर्णन कवीनें पाल्हाळानें घातलें आहे पण त्यांत त्याचें चातुर्य दिसून येतें. मोरोपंतानीं हें दिग्विजयवर्णन अवघ्या एका आर्येत केलें आहे हें ध्यानांत धरण्यासारखें आहे. मुक्तेश्वरानें या साठीं १६८ ओव्या लिहिल्या आहेत. या

वर्णनांत माहिष्मतीनगरींत अग्नीचा कोप झाला आहे ही कथा मुळांत आहे, पण या बाबत दक्षिणेंत व्यभिचार करणें हें पाप नव्हे असें जें मत आलें आहे तें कवीचें आहे. मोरोपंतांनींहि असाच आक्षेप केला आहे, तेव्हां असा आक्षेप ह्या मराठी कवींनीं कां घेतला असावा हें शोधून काढावयास हवें.

राजसूय भोजनविधि हा पूर्णपणें मुक्तेश्वराचा असणें हें क्रमप्राप्त आहे; व त्यांत बराच स्वतत्र भाग आहे. भोजनाचे पदार्थ पूर्णपणें मुक्तेश्वर-कालीनच आहेत. त्यांवर मधून मधून झालेलीं अध्यात्मिक रूपकें पण त्याचींच आहेत. त्याप्रमाणें कामाच्या व्यवस्थेंत मुळांत जरी आधार असला, तरी १ लक्षाची एक पंगत होत होती व अशी एक पंगत झाली कीं स्वर्गांत घंटानाद होई हा भाग स्वतंत्र आहे. तसेंच शुकमुनीचा जो प्रसंग शेवटीं वर्णन केला आहे त्याला पण मूळ महाभारतांत स्थान नाहीं.

अग्रपूजा प्रसंगांत कृष्णाच्या मूर्तीचें जे सुरेख व तत्त्वज्ञानात्मक अर्थ असणारें वर्णन आहे तें सर्व मुक्तेश्वराचेंच. त्यांत भक्तीला अवसर सांपडला व म्हणूनच कवीनें विस्तार केला. भीष्मानें भाषण केलें तें मूळांत नाहीं. या ठिकाणीं धर्मराजा भीष्माला विचारतो व त्यावर भीष्म कृष्णाचें नांव सुचवितो इ. भाग आहे तो स्वतः कवीचा आहे. शिशुपालानें केलेलीं निंदा मात्र मूळास धरून आहे. त्यांतील भूलिंग पक्ष्याची कथा मुळांत आहे; एकंदर आशय जरी तोच असला तरी कवीनें क्रम मात्र बदलला आहे.

शिशुपाल वधाचा प्रसंग हा उठावदार करण्यांत कवीचा भाग बराच आहे. पुढील कथाभागांतहि अशीच कवीची भर पडली आहे. परमात्म्याचें स्वरूप, त्याची कर्तुमकर्तुम् शक्ति इत्यादि गोष्टी या कवीच्या पदरच्या आहेत द्यूतांचे वर्णनांत बारकाई बरीच दाखविली आहे.कवीची रसवत्ता तेथें प्रतीत होते.

त्यानंतर महत्त्वाचा प्रसंग म्हणजे द्रौपदीवस्त्रहरणाचा. त्या प्रसंगीं तिनें केलेला धावा कवींचा आवडता विषय झालेला आहे. मुक्तेश्वरानें ज्या भारताचा आधार घेतला त्यांत अवघे तीन श्लोक द्रौपदीच्या धाव्यासाठीं आहेत. भांडारकरप्रतींत त्याचा उल्लेखहि नाहीं हें विचारांत घेण्यासारखें आहे. कवीनें या प्रसंगीं स्वतःचें सारें कवित्व व ज्ञान प्रदर्शित केलें आहे. द्रौपद्रीचा धावाही, भक्तीचा आविष्कार व कृष्णस्तुति या दोन्ही दृष्टींनीं स्वतंत्र कर्तृत्व म्हणून पाहण्यासारखा आहे. तिच्या वस्त्रांची व त्यांच्या वर्णनाची

तीच स्थिति. पांडवगमनाचा प्रसंग हा कवीनें सहानुभूतीनें रंगविला आहे. त्यांतील कुंतीचा विलाप हा कवीचा आविष्कार आहे. निरनिराळ्या गोष्टींची व्यवस्था लावतांना सुभद्रेला माहेरी पाठविली हा तपशील देऊन, "सांगो विसरला व्यास कवि" असें सांगावयासहि तो कमी करीत नाहीं. सतराव्या अध्यायांत विशेष फरक नाहीं पण वर्णनांत जिवंतपणा कवीनें आणला आहे

मुळापासून कोणकोणते फेरफार कवीला करावेसे वाटले त्यांचें हें थोडक्यांत विवेचन झालें. यावरूनहि प्रथम व्यक्त केलेल्या धोरणाचा बोध होतो, व हे फरक इतक्या सफाईनें झाले आहेत कीं मुळावेगळे असें कांहीं आले आहे असें वाटतहि नाहीं व त्यांतच कवीचें श्रेष्ठपण सामावलें आहे असें म्हणतां येईल.

या विवेचनावरून मुक्तेश्वरानें कोणते फरक केले व प्राचीन कवींचें जुन्या प्रसिद्ध काव्याचे अनुवादाबाबत कोणतें धोरण होतें याचा उलगडा होईल. अशा प्रकारें जुन्या कवींनी महाभारत–रामायणाच्या कथा जरी गाइल्या तरी त्यांना ' भाषांतरे ' म्हणणें युक्त होणार नाहीं. मराठींत कथा आणण्यांत त्यांचा उद्देश निश्चितपणें भाषांतरापेक्षां अन्य होता. व मागें एका ठिकाणीं पाहिल्या प्रमाणें त्यांना व्यापक असें सामाजिक अधिष्ठान होतें. या सामाजिक अधिष्ठानाच्या योगानेंच त्यांना ' भाषांतरे ' कवि म्हणणें योग्य होणार नाहीं. त्यांनीं स्वतःचा म्हणून जो फरक केला तो निश्चितपणें या सामाजिक अधिष्ठानाला पोषक आहे. व मुक्तेश्वरासारख्या कवीचें तर अशा उल्लेखांतच मोठेंपण दिसून येतें. द्रौपदीवस्त्रहरणाचे प्रसंगीं जेव्हां तिला सभास्थानीं आणिलें तेव्हां तिनें जे प्रश्न विचारले ते व त्यांचीं उत्तरें हीं सर्व मुक्तेश्वराच्या प्रतिभेचीं प्रामुख्यानें आहेत. बाराव्या अध्यायांत धर्माची गति विचित्र आहे असें जें व्यासांचें वचन आहे त्याचें मुक्तेश्वरानें जें स्पष्टीकरण केलें आहे तें पाहिलें कीं त्याची तात्विक भूमिका व अध्ययन किती श्रेष्ठ होतें याची साक्ष पटते. सर्वच महत्त्वाच्या समस्यांत खरें कोणतें, खोटें कोणतें, न्याय्य कोणतें अन्याय कोणतें, हें समजत नाहीं, व अशा रीतीनें अगतिक होऊन मनुष्य दैववादाचा आश्रय करतो ह्या गोष्टीस " विचारें पाहतां न मिळे साक्षी । म्हणोनि [illegible] प्रारब्धपक्षीं । जैसां समुद्रीं भ्रमोनी पक्षी । नौका

स्तंभीं आरूढे ॥" अशी भव्य व अत्यंत योग्य अशी उपमा दिली आहे. आणि ती मुक्तेश्वराची स्वतःची आहे हें लक्षांत घेतलें कीं त्याचें श्रेष्ठपण पटतें व त्यासंबंधी शंकाच उरत नाहीं.

मुक्तेश्वरानें सर्व भारताची पसंती करावी यांतच त्याचें मोठेपण आहे. महाभारत जसें आर्ष महाकाव्य आहे, तसेंच मुक्तेश्वराचें सर्व भारतहि आर्ष व अस्सल मराठी असें झालें असतें. आणि महाकाव्याला आवश्यक असणारे भव्यता, तत्त्वज्ञानाची कणखर पार्श्वभूमि, सामाजिक अधिष्ठान व सूक्ष्म अवलोकन हे सर्व गुण त्याच्या काव्यांत विशाल प्रमाणांत दिसून येतात, आणि त्यावरून प्राचीन मराठी कवींच्या मोठेपणाबद्दल व त्यांच्या कार्याच्या श्रेष्ठतेबद्दल शंका बाळगण्याचें बिलकूल कारण नाहीं असें पटतें.

# मुक्तेश्वरावरील संभाव्य प्रश्न

(१) सभापर्वांत मुक्तेश्वराच्या प्रतिभेचे कोणकोणते विशेष स्पष्ट होतात त्याचें सोदाहरण विवेचन करा

(२) मूळ महाभारतांतील कथाभाग घेण्यासंबंधीं व त्यांत फरक करण्या-संबंधीं कोणतें धोरण मुक्तेश्वरानें अवलंबिलें आहे? मूळकथेंत त्यानें कोणते ठळक बदल केले ते सांगून त्यांच्या योग्यायोग्यतेबाबत चर्चा करा.

(३) राजसूय यज्ञसभा व द्यूतसभा या दोन सभांतील साम्य व विरोध कथाभागाच्या अनुरोधानें स्पष्ट करा.

(४) 'प्राचीन मराठी कवींतील अव्वल दर्जाचा राष्ट्रीय कवि' असें मुक्ते-श्वराचें मोठेंपण चिं. वि. वैद्य यांनीं वर्णिलें आहे. तें कितपत समर्पक आहे हें सभापर्वाच्या आधारें स्पष्ट करा.

(५) महाकवि म्हणून मुक्तेश्वर व नरेंद्र यांची तुलना करा.

(६) थोडक्यांत टिपणें करा.

१. नारदनीति वा राजकर्तव्यें
२. महाभारत व कथाकवि
३. मुक्तेश्वराचें वर्णनकौशल्य
४. पांडव दिग्विजय
५ जरासंध व शिशुपाल

(७) स्वभाववर्णनांत मुक्तेश्वराचें मोठेपण विशेष दिसून येतें, हें मत सभा-पर्वांतील प्रमुख स्वभावचित्रांच्या आधारें स्पष्ट करा.

(८) मयसभा, द्रौपदीवस्त्रहरण, अग्रपूजासमारंभ यांचें चिकित्सक रस-ग्रहण करा.

